


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत मराठी अभ्यास परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या भाषा आणि जीवन ह्या नियतकालिकाच्या (त्रैमासिक) अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून मराठी अभ्यास परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका

# भाषा आणि जीवन

मराठी अभ्यास परिषद पत्रिका

वर्ष ३० । अंक १ । हिवाळा २०१२

कागदच झाले । जीवाचे आधार
नौकेला बंदर । विश्रांतीस ।।

त्यांनीच खोवले । मंदिलात तुरे
निंदेचे निखारे । तेही त्यांचे ।।

कीर्तीचेही रस्ते । कागदामधून
शून्याला सांत्वन । कागदांचे ।।

असे कागदांचे । माझ्यावरी ऋण
जगण्याचा सण । केला त्यांनी ।।

\- कुसुमाग्रज



अनुक्रमणिका

**संपादक :** नीलिमा गुंडी

**संपादकीय-सल्लागार :** अशोक रा० केळकर, मॅक्सीन बर्नसन, आशा मुंडले

**संपादन-समिती :** नीलिमा गुंडी (प्रमुख), प्र०ना० परांजपे, मृणालिनी शहा, विजय पाध्ये, आनंद काटीकर

**संपादकीय पत्रव्यवहार :** नीलिमा गुंडी, 3, अन्नपूर्णा, 1259, शुक्रवार पेठ, सुभाषनगर, पुणे 411002. संपर्क : (020) 24486015 ई-पत्ता : nmgundi@gmail.com

**प्रकाशक, मुद्रक, व्यवस्थापकीय पत्रव्यवहार व वर्गणी पाठविण्यासाठी पत्ता :** आनंद काटीकर, द्वारा मृणालिनी शहा, 1, शीतल अपार्टमेंट्स, 46/4, एरंडवणे, पुणे 411004. चलभाष : 94216 10704

**मुद्रण-स्थळ :** भंडारी मुद्रणालय, सिंहगड मार्ग, पुणे 411051. स्थिरभाष : (020) 24348756

---

मराठी अभ्यास परिषदेच्या www.marathiabhyasparishad.com या संकेतस्थळाचे व्यवस्थापक : **चित्तरंजन भट - 093731 04093 विजय पाध्ये** - 098220 31963. marathiabhyaparishad@gmail.com या ई-पत्त्यावर पत्रव्यवहाराचे स्वागत आहे.

---

(१) वार्षिक वर्गणी

| | एक वर्ष | तीन वर्षे | पाच वर्षे |
|---|---|---|---|
| व्यक्ती : | ₹ १५०/- | ₹ ४००/- | ₹ ७००/- |
| संस्था : | ₹ २००/- | ₹ ५५०/- | ₹ ९००/- |

सुट्या अंकाची किंमत ₹ ४०/- (कोणत्याही अंकापासून वर्गणीदार होता येते.)

(२) मराठी अभ्यास परिषदेचे **आजीव सदस्यत्व (फक्त व्यक्तींसाठी) शुल्क ₹ २,०००/- + नोंदणी शुल्क ₹ १००/-.** आजीव सदस्यांना 'पत्रिके'चा अंक पाठवला जातो.

(३) **पैसे भरण्याबद्दल सूचना :** वर्गणी प्रत्यक्ष, रोखीने, किंवा धनादेशाने देता येईल. वर्गणी भरण्याचा सोपा मार्ग म्हणजे महाराष्ट्र बँकेच्या कुठल्याही शाखेत मराठी अभ्यास परिषदेच्या (टिळक मार्ग शाखा, पुणे) **बचत खाते क्र०** 20057164260 या खात्यात वर्गणी भरणे व आमच्याकडे पैसे भरल्याचे चलन पाठवणे. चलनावर स्वत:चे नाव, पत्ता लिहिण्यास व चलनाची छायाप्रत स्वत:कडे ठेवण्यास विसरू नये. **कृपया मनिऑर्डर पाठवू नये. धनादेश 'मराठी अभ्यास परिषद' या नावाने काढावा. धनादेश पुण्याबाहेरच्या शाखेचा असल्यास आणि 'ॲट पार' नसल्यास रकमेत ₹ ५०/- वटणावळ अधिक घालावी.** धनादेशासोबत आपले नाव, पत्ता, रक्कम, कोणत्या वर्षासाठी वर्गणी ते अवश्य लिहावे.

(४) **जाहिरातीचे दर :** पूर्ण पान ₹ २,५००/-, अर्धे पान ₹ १,५००/-, पाव पान ₹ ८००/-, शुभेच्छा ₹ ४००/-, आवरण पृष्ठ तीन ₹ ३,०००/- जाहिरात मराठीत असल्यास उत्तम, हिंदीत, इंग्रजीत असल्यास चालेल.

---

**प्रकाशन :** त्रैमासिक; जानेवारी(हिवाळा), एप्रिल(उन्हाळा), जुलै(पावसाळा), ऑक्टोबर(दिवाळी).

**सूचना :** (१) पत्रिकेत प्रसिद्ध होणाऱ्या लेखांच्या/लेखकांच्या मतांशी संपादक किंवा परिषद सहमत असतीलच, असे नाही. (२) **या अंकाच्या प्रकाशनासाठी महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाचे अनुदान मिळालेले आहे. तथापि या नियतकालिकातील लेखकांच्या विचारांशी साहित्य संस्कृती मंडळ व राज्यशासन सहमत असतीलच असे नाही.** **या अंकाचे मूल्य ₹ ४०/-**

## अनुक्रमणिका

संपादकीय

# संवादाचा सुवावो ढळे

नीलिमा गुंडी

''म्हणूनि संवादाचा सुवावो ढळे । तरी हृदयाकाश सारस्वतें वोळे ।''
('ज्ञानेश्वरी' अध्याय ९, ओवी २८)

ज्ञानेश्वरांचा वरील अवतरणातील दृष्टांत हा श्रोता-वक्ता यांच्या संबंधाप्रमाणेच कलावंत-रसिक यांच्यांतील नात्यालाही लागू पडणारा आहे. संवादरूपी अनुकूल वारा वाहिला तर माझ्या हृदयरूपी आकाशात कल्पनाविचाररूपी मेघांची दाटी होईल, असे यातून ज्ञानेश्वरांना सुचवायचे आहे. संवादाला इतके महत्त्व असूनही आपल्या साहित्य कला संस्कृतीतील संवादाचा अभाव, ही बाब जणू आमच्या परंपरेचा स्थायीभाव झाली आहे की काय; असा प्रश्न अनेकदा पडतो.

कलेच्या आस्वादात रसिकाची भूमिका ही सहसर्जनाची असते; असे काही समीक्षक मानतात. तरीही 'रसिक' हे पद आपल्याकडे फारशी चिकित्सा न करता सरसकट सर्वांसाठीच वापरले जाते. सर्वच वाचक/प्रेक्षक/श्रोते यांना 'रसिक' हे संबोधन वापरण्याचा आपला परिपाठ असतो. प्रत्यक्षात त्यांच्यातील रसिकतेची निगराणी करण्याकडे आपण फारसे लक्ष देत नाही. त्यामुळे रसिकांचा सहज वा चोखंदळपणे मिळालेला प्रतिसाद कमी प्रमाणात आढळतो. विशेषत: दृश्यकलांबाबत तर ही वस्तुस्थिती चिंताजनक वाटावी अशी आहे. या कलांना रसिकांच्या प्रतिक्रिया न मिळण्याची कारणे काय असू शकतात? वस्तुस्थिती अशी आहे की अनेक कलामाध्यमांचे विश्व ताकदीने टिपणारी भाषा आपल्याकडे पुरेशी विकसितच झालेली नाही.

आपल्या समाजात चित्रसाक्षरता आजही पुरेशा प्रमाणात रुजलेली नाही. नवचित्रकला तर आपल्याकडे विनोदाचा विषयच मानली गेली आहे. या 'दगडांच्या देशा'त जगप्रसिद्ध शिल्पे खोदली गेली, पण चित्रकलेतील तरलता जाणून घ्यायची रसिक दृष्टी सर्वसामान्यांमध्ये दुर्मीळच राहिली. कधी 'चित्र कळतच नाही', तर कधी 'चित्राला प्रतिक्रिया कोणत्या भाषेत (खरं तर परिभाषेत) द्यावयाची, ती भाषा अंगवळणी पडलेली नाही'; अशी सर्वसामान्यांची भावना दिसते. त्याच वेळी 'चित्राचे असणे' हेच पुरेसे असते, चित्रातून तर्कसुसंगत अर्थ शोधण्याचा अट्टहास कशाला करावयाचा; अशीही काहींची भूमिका असते. अशा वेळी चित्राच्या अस्तित्वातील संवेद्य विश्व - रंग, रेषा





अनुक्रमणिका

आकार, अवकाश, पोत - यांचे रसग्रहण कसे करावयाचे; हे न समजल्यामुळे जर चित्र आवडले, तर त्यासाठी 'सुंदर' या एकाच विशेषणाचा सरधोपटपणे आधार घेण्याचा अनेकांचा कल असतो. समजा, चित्र नाही आवडले तर 'ते आपल्याला कळले नसणार', असे समजून गप्प बसणे काहीजण पसंत करतात. चित्र जाणून घेताना त्यात स्वत:च्या कल्पनेने विविध अर्थवलये निर्माण करण्याचा मार्गही काहीजण चोखाळतात. चित्राचे सौंदर्य व्यक्तिनिष्ठ की वस्तुनिष्ठ हा पेच त्यामुळे निर्माण होत राहतो.

यासंदर्भात 'अभिरुचि' मासिकाच्या दिवाळी १९४६च्या अंकाचे एका अनामिक चित्रकाराने काढलेले मुखपृष्ठ आणि डिसेंबर १९४६च्या अंकातील त्यावरील दोन प्रतिक्रियांचा उल्लेख करावासा वाटतो. या दोन प्रतिक्रियांमधील अंतर लक्षात घेण्याजोगे आहे. एक प्रतिक्रिया आहे, पु०य० देशपांडे यांची. ती अशी : ''...पांढऱ्याशुभ्र पार्श्वभूमीवरील भडक रंगांच्या पट्ट्यांतून दृग्गोचर होणारी दोन-तीन साधी पाने, एक शुभ्र कळी व गाभ्यात पिवळा मधुगंध साठवलेले एक शुभ्र फूल आणि भडक रंगांच्या पट्ट्यांत बेमालूम मिसळून गेलेले व त्यामुळेच लक्षात न येणारे एक फुलपाखरू - एवढ्या अत्यल्प व अत्यंत साध्या सामग्रीतून अभिरुचीचे सुंदर प्रतीक या अनामिक चित्रकाराने निर्माण केले आहे.''[१] तर 'अभिरुची'मधील 'वादसंवाद' हे समकालीन संस्कृतिविश्वाविषयी मिश्कील भाष्य करणारे सदर लिहिणाऱ्या निषाद आणि शमा यांपैकी निषाद (मं०वि० राजाध्यक्ष) यांनी लिहिले आहे : ''माझी चित्रकलेतील गती बेताचीच. शाळेत असताना ड्रॉइंगच्या निमित्ताने रंग व इतर साहित्य पळवण्याची फक्त तालीम घेतलेली; पण चित्रकला समजली नाही तरी प्रतीकशोधनाची सूक्ष्मता मराठी साहित्यवाचनाने अंगात भिनल्याची खात्री पटल्यावरून मीही त्या दिशेने उपद्व्याप केला. त्याचे फलित असे : फुलपाखराच्या पंखाचे नेपोलिनच्या टोपीशी साम्य, फुलासारखा दिसणारा पांढरा-पिवळा डाग हे अष्टावक्र अंडे, पानांच्या शिरात खुपणाऱ्या या भुकेल्या जगाच्या बरगड्या, आणि मागील रंगब्रह्म या घोटाळ्यांतून हुकूमशाहीने जीवनाची विकासापूर्वीच होणारी गळचेपी किंवा विकृती आणि नव्या संस्कृतीची भडक कृत्रिमता किंवा तिचे रंगीत अराजक - इतकी धाव गेली.''[२] यातील विनोदाचा भाग हा चित्र जाणण्याविषयीची आपल्या समाजाची अज्ञता लक्षात आणून देणाराच आहे.

स्वातंत्र्योत्तर कालखंडात या परिस्थितीत थोडा बदल होत आहे. चित्रकलेचा आस्वाद घ्यायची भाषा घडविण्याचे प्रयत्न जाणीवपूर्वक केले गेले आहेत. त्यातील काहींचा उल्लेख करायला पाहिजे. उदाहरणार्थ प्रल्हाद धोंड यांचे 'रापण', तसेच द०ग० गोडसे यांचे 'पोत', प्रभाकर बरवे यांचे 'कोरा कॅनव्हास' अशी चित्रकार, कलासमीक्षक मंडळींची पुस्तके अलीकडे मोठ्या प्रमाणावर प्रकाशित होत आहेत. जगप्रसिद्ध चित्रकार, शिल्पकार यांच्यावर चरित्रात्मक कादंबऱ्या लिहिल्या गेल्या आहेत. 'चिन्ह'सारखे नियतकालिक,

'खेळ' या नियतकालिकातील काही लेखन आणि सुधीर पटवर्धनादी चित्रकारांच्या चित्रप्रदर्शनानिमित्त त्यांच्या चित्रांविषयीचे दीपक घारे यांचे वैशिष्ट्यपूर्ण लेखन यांतूनही चित्रातील कलात्मक घटकांचे भान शब्दांकित करण्याचे प्रयत्न होत आहेत. 'आपले वाङ्मयवृत्त' या लोकवाङ्मयगृहाच्या मासिकातून नीतिन दादरावाला हे जगप्रसिद्ध छायाचित्रकारांच्या शैलीविषयी सातत्याने लिहीत आहेत, त्याचीही येथे नोंद घ्यायला हवी. चित्रसाक्षरता रुजविण्यासाठी माधुरी पुरंदरे आणि नंदिता वागळे यांनी 'वाचू आनंदे' (ज्योत्स्ना प्रकाशन व राज्य मराठी विकास संस्था, २००१) या संपादित पुस्तक-मालिकेची शिशु व कुमार गटातील वाचकांसाठी केलेली चार भागांमधील निर्मिती हाही एक महत्त्वाचा प्रकल्प होय. या पुस्तकांमध्ये निवडक वाङ्मयीन उताऱ्यांबरोबरच निवडक चित्रांचाही समावेश आहे. चित्रकला ही गोष्ट मुलांच्या आवाक्यातील गोष्ट व्हावी, हे त्यामागचे उद्दिष्ट आहे. अशा अनेकविध प्रयत्नांमुळेच मराठी वाङ्मयाच्या इतिहासात अलीकडे प्रथमच 'चित्रकला-शिल्पकलाविषयक वाङ्मय' असे स्वतंत्र प्रकरण समाविष्ट झालेले दिसते. (पाहा : महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे तर्फे २०१०मध्ये प्रकाशित 'मराठी वाङ्मयाचा इतिहास', खंड ७, भाग २) अर्थात अजूनही खूप मोठ्या प्रमाणावर असे लेखन होण्याची गरज आहेच.

एकंदरीत 'भाषा आणि जीवन'मध्ये विविध ज्ञानक्षेत्रांबरोबरच कलाक्षेत्रांच्या संदर्भातील भाषेविषयीचे लेखनही मोठ्या प्रमाणावर समाविष्ट व्हावे, अशी आमची इच्छा आहे. 'भाषा आणि जीवन'च्या भाषाविषयक जीवनस्पर्शी धारणेशी ते सुसंगतच ठरेल.

**संदर्भ :**


(१) मं०वि० राजाध्यक्ष, द०ग० गोडसे, 'वादसंवाद' (संपादक ग०रा० कामत, मीना गोखले), मौज प्रकाशन, मुंबई २००३, पृ० ९३.

(२) तत्रैव, पृ० ९२.


■

## अभिनंदन

संस्कृत भाषेचे गाढे विद्वान **प्रा० कृ०श्री० अर्जुनवाडकर** यांना इ०स० २०११ चा राष्ट्रपती पुरस्कार जाहीर झाला आहे. 'मानव संसाधन विकास मंत्रालय, नवी दिल्ली' तर्फे हा सन्मान त्यांना देण्यात येणार आहे. यानिमित्ताने संस्कृत आणि मराठी व्याकरणाचे तज्ज्ञ अभ्यासक आणि व्यासंगी अशा प्रा० अर्जुनवाडकर यांच्या जीवनकार्याचा उचित गौरव होत आहे. परिषदेतर्फे त्यांचे मन:पूर्वक अभिनंदन!

# दूरचे प्रतिध्वनी

अरुण खोपकर

[ अरुण खोपकर यांनी पुणे येथे २४ जुलै २०११ला 'भास्कर चंदावरकर मेमोरिअल व्याख्यान' दिले. त्यात त्यांनी चित्रपटासारख्या आधुनिक कलेचे प्राचीन भारतीय सौंदर्यशास्त्राशी असलेले नाते उलगडून दाखवले आहे. त्या व्याख्यानातील संपादित भाग येथे देत आहोत. संपादक ]

**आकर्षण आणि आकर्षणाचा मोंताझ**

आईझेन्श्टाईन ह्यांनी १९२०च्या काळात मांडलेली पहिली महत्त्वाची संकल्पना आहे आकर्षणाची. ह्या संकल्पनेचा उगम त्यांच्या रंगभूमीवरच्या अनुभवात होता. तिची व्याख्या करताना ते म्हणतात, ''आकर्षण ही रंगभूमीवरची आक्रमक क्रिया आहे. तिच्या साहाय्याने प्रेक्षकांना विशिष्ट प्रमाणात आणि नियमितपणे, मानसिक आणि शारीरिक धक्के दिले जातात. त्या धक्क्यांतून त्यांना एका विशिष्ट विचारसरणीकडे नेण्यात येते. हा धक्का रंगभूमीवर दाखवलेल्या प्रत्यक्ष प्रयोगात शारीरिकरीत्या देण्यात येतो. ग्रां ग्युनोल ह्या रंगभूमीवर पात्रांचे डोळे फोडून किंवा हातपाय तोडून प्रेक्षकाला हा रक्तरंजित धक्का देत असत.''

आईझेन्श्टाईन ह्यांच्या 'बॅटलशिप पोटेमकिन' ह्या चित्रपटात एका स्त्रीचा रक्तबंबाळ झालेला डोळा किंवा 'स्ट्राईक' ह्या चित्रपटात मान चिरलेल्या बैलाने दिलेले शेवटचे आचके आणि वाहणाऱ्या रक्ताची धार, अशी आकर्षणाची अनेक उदाहरणे देता येतील.

भारतीय रंगभूमीचा एक अभिजात आविष्कार असलेल्या कथकली या नृत्यनाट्यात भारतीय परंपरेतील आकर्षणाचा अनुभव आढळतो. अशा एका प्रसंगाचे वर्णन श्री० भरत अय्यर ह्यांच्या कथकलीवरच्या पुस्तकातून उद्‌धृत करतो :

'शूर्पणखा एका सुंदर स्त्रीच्या रूपात येऊन लक्ष्मणाला मोहित करू पाहते. त्यात तिला अपयश आल्यावर ती त्याचे हरण करू पाहते. तेव्हा लक्ष्मण तिचे नाककान कापतो. त्यानंतरचा प्रसंग हा नीणम् म्हणून ओळखला जातो. याचा अर्थ रक्तप्रदर्शन. रक्ताने भरलेली काळीकभिन्न राक्षसी रंगभूमीच्या विरुद्ध दिशेने काळोखातून अवतरते. ती असह्य होणाऱ्या वेदनांमुळे कंप सुटेल अशा अक्राळविक्राळ आरोळ्या मारत येते. पिशाच मोकाट सुटल्यासारखी ती प्रेक्षकांतून सैरभैर हिंडत मार्ग काढते. मशालींच्या





अनुक्रमणिका

धगधगणाऱ्या आगीत आणि राळेच्या भपकाऱ्यात ती प्रेक्षकाला दिङ्मूढ स्थितीपर्यंत नेते. धमाधम वाजणाऱ्या तालवाद्यांनी प्रसंगाच्या भीतिदायक स्वरूपात आणखीच भर पडते. डोळे व कान आपली सारी शक्ती एकवटून हे भयानक आणि बीभत्सरसपूर्ण दृश्य अनुभवत राहतात. हा अनुभव आपल्या स्मरणपटलावरून कधीच पुसला जात नाही. अशा रक्तदर्शनाच्या प्रसंगांपूर्वी सूचना देऊन हृदयविकार असणाऱ्या व्यक्ती, गर्भवती स्त्रिया, लहान मुले ह्यांना बाहेर जायला सांगितले जाते.'

भरतमुनींच्या नाट्यशास्त्राच्या औचित्यनियमांत अशा प्रकारचे प्रसंगचित्रण वर्ज्य मानले आहे. तरीही कथकलीत त्याचा प्रभावी उपयोग केला जातो. आर्यांच्या संस्कृतीपूर्वीच्या आदिम संस्कृतींचे अनेक स्तर आजही केरळच्या रंगभूमीच्या विविध प्रकारांत आढळतात. त्यांच्या प्रभावी आणि प्रतिभाशाली प्रदर्शनामुळे केरळचे नृत्यप्रकार हे जागतिक पातळीवर रंगभूमीच्या श्रेष्ठ प्रकारांतले मानले जातात.

कथकलीचे हे जे वर्णन आहे त्यात त्रिमिती सिनेमाचीही पाळेमुळे दडली आहेत. आईझेन्स्टाईन ह्यांच्या काळात आज दिसतो तशा त्रिमिती सिनेमाची तांत्रिक शक्यता नव्हती. पण त्रिमिती सिनेमाचा त्यांनी तात्त्विक दृष्ट्या विचार केला. त्यांनी त्रिमिती सिनेमाचे मुख्य तत्त्व म्हणून जे सांगितले ते असे : सर्वसाधारणपणे सद्य:कालीन रंगभूमीवर होणाऱ्या प्रसंगांत आणि प्रेक्षकांत एक सुरक्षित अंतर असते. मात्र जेव्हा हे अंतर नष्ट होऊन प्रेक्षक रंगभूमीत खेचला जातो किंवा दृश्य प्रेक्षकात फेकले जाते तेव्हा द्विमिती पडद्यावरही त्रिमितीचा भास होतो. प्रेक्षक आणि प्रेक्षणीय यांतली सुरक्षित सीमारेषा पुसून जाते आणि आक्रमक अशी तिसरी मिती अनुभवाला येते. त्रिमिती सिनेमात प्रेक्षकांच्या अंगावर येणारे किंवा त्याला पडद्यावर खेचून घेणारे शॉट्स सर्वात प्रभावी ठरतात. जेव्हा नाककान कापलेली रक्तरंजित शूर्पणखा प्रेक्षकात आरोळ्या ठोकत थैमान घालते तेव्हा 'सराऊंड साऊंड' आणि 'थ्री-डी सिनेमा' ह्या दोन्हीचाही प्रेक्षकाला अनुभव येतो.

कथकलीचे आणि त्रिमिती सिनेमाचे नाते जोडायला मदत करणारे आईझेन्स्टाईन यांचे सिनेविचार एकाच वेळी भूतकालाला आणि भविष्यकालाला स्पर्श करतात. तो गुण भारतीय संस्कृतीतल्या श्रेष्ठ प्रयोगांतही आहे. परंतु आपल्या कलांचा अशा प्रकारे आधुनिक दृष्टिकोनातून विचार होत नाही. वर सांगितल्याप्रमाणे एका सूत्राचा मला परत उल्लेख करावासा वाटतो. ते म्हणजे श्रेष्ठ कला ही कधीच एका संस्कृतीची असत नाही. कथकलीवर भरतमुनींचे नाट्यशास्त्र, आदिम संस्कृतीचे रिचुअल्स, व्यापाराकरता केरळला आलेल्या मोपला मुस्लिमांची संस्कृती असे अनेक प्रकारचे प्रभाव दिसून येतात. त्यांच्या अजोड संयुगातून हा नाट्यप्रकार जन्मला आहे.

**कलांचा परस्परसंबंध**

भारतीय कलाविचारांतील दृश्य कलांवरचा एक महत्त्वाचा ग्रंथ म्हणजे

'विष्णुधर्मोत्तरपुराण'. कोणत्याही कलेचा विचार करताना तिचे इतर कलांशी असलेले विविध संबंध लक्षात घेण्याची किती गरज आहे, याचे उत्कृष्ट उदाहरण विष्णुधर्मोत्तरपुराणातल्या एका कथेत आहे. ग्रंथाच्या तिसऱ्या भागात राजा वज्र आणि मार्कंडेय ऋषी ह्यातला हा संवाद प्रसिद्ध आहे :

'राजा वज्राला देवतांच्या योग्य स्वरूपात त्यांची पूजा करण्याची इच्छा असते. त्याकरता मूर्ती करण्याची त्यांची कला शिकवण्याकरता शिष्य म्हणून मार्कंडेय ऋषींनी आपला स्वीकार करावा अशी राजा त्यांना विनंती करतो. ऋषी त्याला सांगतात की चित्रकलेचे ज्ञान असल्याखेरीज मूर्तिकला येणार नाही. मग राजा त्यांना चित्रकला शिकवण्याची विनंती करतो. तेव्हा ऋषी म्हणतात की, उत्तम नर्तक झाल्याखेरीज त्याला चित्रकला येणार नाही. मग राजा त्यांना नृत्य शिकवायची विनंती करतो. तेव्हा ते त्याला समजावतात की वाद्यसंगीताचे आणि लयीचे उत्तम ज्ञान असल्याखेरीज नृत्य येणे अशक्य. मग राजा त्यांना ह्या सर्व कला शिकवण्याची विनंती करतो. तेव्हा ते म्हणतात की गायनात नैपुण्य मिळाल्याशिवाय वाद्यसंगीत येणे शक्य नाही. राजा ह्या सर्व पायऱ्या ओलांडून गेल्यानंतर मग ते त्याला मूर्तिकला शिकवतात.'

विष्णुधर्मोत्तरपुराणातले हे विचार आजचे आणि सिनेमाबद्दलचे असावेत इतके सिनेमाला चपखल बसतात. जेव्हा अनेक कलांचेच नव्हे तर शास्त्रांचे आणि तंत्रांचे बेमालूम संयुग होते तेव्हाच श्रेष्ठ सिनेमा जन्माला येतो. ह्यातल्या जितक्या कलांवर दिग्दर्शकाची अधिक पकड तितका त्याचा सिनेमा अधिक फुलतो, अर्थवाही होतो.

सिनेविचारांमध्ये सिनेमाचे स्वत:चे असे खास स्वरूप शोधण्याचा प्रयत्न जास्त प्रमाणात झाला. पण आईझेन्स्टाईन यांनी त्याच्या विरुद्ध दिशेनेही विचार करून सिनेमा आणि इतर कलांना समाईक असलेल्या तत्त्वांचा शोध घेतला. त्यांचे एक अवतरण इथे मांडतो. त्यात एक हजार वर्षांनंतर विष्णुधर्मोत्तरपुराणातल्या विचारांचा प्रतिध्वनी ऐकू येतो.

'वास्तविकपणे कलाकार जी कला वापरतो तिच्यात दुय्यम असे काहीच नसते. जो चित्रकार असतो त्याच्या अंतरंगात कवी आणि संगीतकारही असतात. त्याच्या सर्जनाच्या आविष्कारात तो त्या सर्वांना एकत्र आणतो.

'जेव्हा त्याची सर्जनशीलता एका विशिष्ट कलेत प्रकट होते तेव्हा ती अनेक स्तरांनी व्यक्त होते. त्यामुळे चित्रकला, संगीत, कविता ह्या कोणत्याही कला स्वयंपूर्ण मानता कामा नयेत. तसेच त्यातील कोणत्याही एका कलेला इतर कलांकरता नमुना म्हणून ठेवण्याइतके प्राधान्य देता कामा नये. कला ही सर्जनशीलतेत असते. तिला कोणत्याही एका विशिष्ट कलेच्या मर्यादा नसतात. सर्जनशीलतेत साऱ्या कला एकवटलेल्या असतात.'

एकविसाव्या शतकात ह्या विचाराला एक वेगळी कलाटणी मिळाली आहे. डिजिटल कलांमुळे आज सिनेमा, ग्राफिक कादंबऱ्या, इलेक्ट्रॉनिक संगीत, कॉम्प्युटर ग्राफिक्स,

व्हिडिओ आर्ट, इन्स्टॉलेशन्स ह्यांच्यातल्या परस्पर देवाणघेवाणीमुळे मार्कंडेयाचे उदाहरण आणि आईझेन्श्टाईन यांचे विचार ह्या दोन्हींच्या सत्याची एक नवीन प्रचीती मिळते.

कलांचा घनिष्ठ परस्परसंबंध हा आईझेन्श्टाईन ह्यांच्या विचाराचा पाया आहे. त्यावरच त्यांनी आपल्या विचारातल्या प्रमुख संकल्पनांची मांडणी केली आहे. सर्व कलांत दिसून येणाऱ्या समाईक तत्त्वांना त्यांनी मूलतत्त्वे मानले आहे. ह्या मूलतत्त्वांचा शोध आणि विश्लेषण करणारे त्यांचे लेखन 'मेथड' ह्या नावाखाली एकत्रित केले आहे. त्याखेरीज त्यांच्या महत्त्वाच्या सिद्धांतांवरचे लेखन एकत्र करणारी पुस्तके आहेत 'मोंताझ', 'रेझिसुरा' आणि 'नॉन-इंडिफरंट नेचर'. पण खरे तर ती पुस्तके एकमेकांत इतकी गुंफली आहेत की एका पुस्तकानंतर दुसरे वाचताना आपण 'क्लायडोस्कोप' फिरवत राहिल्याचा भास होतो. रंगीत काचेचे तुकडे जसे तेच असतात तसे त्यांचे काही विचार स्थायी आहेत; पण ते वेगवेगळ्या संदर्भात येऊन आपली मनोहर रूपे बदलत राहतात. सतत नवता पावणाऱ्या त्यांच्या विशाल विचाराला नेहमी एक नेटके देखणेपण असते.

**सहृदय निसर्ग अथवा नॉन-इंडिफरंट नेचर**

'किंग लिअर' नाटकात जेव्हा लिअरच्या हृदयात काहूर माजते तेव्हा त्याच्या भोवताली वादळ घोंघावते, हे पथेटिक फॅलसीचे नेहमी दिले जाणारे उदाहरण. पथेटिक फॅलसीत निर्जीव वस्तूंना मानवी भावना असल्यासारखे भासवले जाते. विशेषत: निसर्गाला. पंचमहाभूतांची विशिष्ट रूपे मानवी भावनांचे विशाल दर्पण होतात. भारतीय सिनेमातली अशी उदाहरणे पाहिली तर 'पाथेर पांचाली'तले दुर्गाच्या आजारातले वादळ, 'मेघे ढाका तारा'मधील नीता जेव्हा घर सोडून जायला निघते तेव्हा पावसाचे अश्रू ढाळणारा निसर्ग ही उदाहरणे सहज डोळ्यांसमोर येतात. 'चारुलता'मध्ये जेव्हा अमल येतो तेव्हा तो चारूच्या आयुष्यात वादळासारखा येतो, हे त्याच्या येण्याबरोबर सुटलेला वारा व्यक्त करतो. साहित्यात, सिनेमात, नाटकात, चित्रकलेत, चित्रित झालेला निसर्ग आणि मानवनिर्मित परिसरही, सूचकपणे कलाकाराला ज्या भावना प्रेक्षकांपर्यंत पोचवायच्या असतात, त्यांचे प्रतिध्वनी निर्माण करतो.

मानवी अस्तित्वाचा निसर्गाशी कोणत्या प्रकारचा संबंध आहे, हा प्रश्न एका दृष्टीने तत्त्वज्ञानाचा आहे. एका बाजूला अणुरेणूत ईश्वर पाहणारे तत्त्वज्ञान आहे तर दुसऱ्या बाजूला 'अनंत अवकाशाची शांतता माझ्या हृदयाचा थरकाप उडवते' असे म्हणणारा पास्काल आहे. कलेत निसर्गाची जी रूपे येतात, मग ती संपूर्ण निसर्गचित्रणे असोत, किंवा त्यात निसर्ग पार्श्वभूमीला असो किंवा मानवी प्राक्तनाचा सहचारी असो, ही रूपे भावनांना सोडून नसतात, असे आईझेन्श्टाईन यांचे प्रतिपादन आहे. त्याकरता त्यांनी पुश्किनच्या एका कवितेतली एक प्रसिद्ध ओळ संदर्भाला घेऊन 'नॉन-इंडिफरंट नेचर' असे ह्या संकल्पनेचे नामकरण केले आहे.

---





अनुक्रमणिका

निसर्गातील बदल प्रामुख्याने दोन चक्रांनुसार होतात. एक म्हणजे ऋतुचक्र आणि दुसरे म्हणजे दिनचक्र. भारतीय संगीतात ह्या दोन्ही चक्रांचे विशिष्ट रागांशी नाते बांधले आहे. इथल्या ऋतूत वसंत आणि वर्षा ह्या दोन ऋतूंना कृषिप्रधान संस्कृतीत असाधारण महत्त्व आहे. त्यांच्याशी जोडलेल्या बसंत, बहार, देस आणि मल्हार ह्या रागांचे आणि मिश्ररागांचे किती प्रकार आहेत, किती बंदिशी आहेत की ज्यांत ह्या ऋतूंच्या विविध छटा आणि त्याला अनुसरून येणाऱ्या भावच्छटा अनुभवायला मिळतात. मिया की मल्हार ह्या तिन्ही सप्तकात फिरणाऱ्या रागात, पावसाळ्यातल्या बेडकांच्या ध्वनीची आठवण करून देणाऱ्या मंद्रसप्तकातल्या धीरगंभीर आलापापासून विद्युल्लतेच्या लखलखणाऱ्या रेषांबरोबर स्पर्धा करणाऱ्या तार सप्तकातल्या तानांपर्यंत अनेक निसर्गध्वनिचित्रे साधली जातात. जेव्हा 'घनु घुणघुणा' वाजू लागतो, 'वारा रुणुझुणा' वाहू लागतो तेव्हा 'दर्पण पहाता' आपले न दिसणारे रूपही दाखवणारा 'मिया की मल्हार' हा एक अविस्मरणीय संगीताविष्कार आहे.

निसर्गाच्या माणसाशी असलेल्या नात्याच्या श्रीमंत स्वरूपाचे अनेक अलंकार दाखवण्यात केवळ भारतीय संगीतच कुशल नाही; तर रागमाला चित्रांतही अमूर्त रागांना विशिष्ट रंगांनी, रूपाने नटवून त्यांना मूर्त स्वरूप देऊन ध्वनीचे आणि चित्राचे एकीकरण केले आहे आणि त्यांच्याशी निसर्गाचा संबंध जोडला आहे. ज्ञानेश्वरांच्या रसाळ वाणीतून करुणेत भिजलेली अनेक निसर्गचित्रे पदोपदी आढळतात. नामदेवाचे - 'रात्र काळी घागर काळी, जमुनाजळे ही काळी वो माय ।।' हे रंगचित्र, ज्ञानेश्वरांचे निळे अभंग, रामदासांची धवळी आणि पिवळी भूपाळी, कालिदासाचे 'मेघदूत' हे सर्वश्रुत असल्याने त्यांचा येथे विस्ताराने उल्लेख करत नाही. पण रामदासांचे एक ध्वनिचित्र इतके सिनेमॅटिक आणि बोलके आहे की त्याचा उल्लेख केल्यावाचून राहवत नाही.

गिरीचे मस्तकी गंगा तेथुनी लोटल्या बळें ।
धबाबां लोटल्या धारा धबाबा तोय आदळे ।।

सिनेमाचे मूकपटातून ध्वनिपटात रूपांतर झाल्यापासून चित्राचा आणि ध्वनीचा परस्परसंबंध काय असावा ह्यासंबंधी अनेक चर्चा आणि विवाद झाले आहेत, होत आहेत. कोणत्या प्रकाशरचनेबरोबर कोणती ध्वनिरचना केल्यास त्याचा काय परिणाम होतो, उच्च स्वरांबरोबर लहरींची संख्या जास्त असलेल्या निळ्या आदी रंगांची रचना ही अधिक भाववाही होते का, पिवळा-तांबडा ह्या उष्ण रंगांबरोबर मंद्र सप्तकाचा वापर केल्यास काय परिणाम होतो किंवा एखाद्या स्वररचनेने कोणत्या प्रकारचे अवकाश सूचित होते; हे प्रश्न अनेकदा विचारले जातात. रागमाला - चित्रांत अशा प्रकारच्या प्रश्नांना अनेक उत्तरे दिलेली आहेत, अनेक शक्यतांचा विचार केला आहे.

भारतीय कलांत अशा प्रकारच्या प्रश्नांची केवळ चर्चाच झाली नाही तर त्याच




अनुक्रमणिका

उत्तरे शोधणारे महत्त्वाचे आणि यशस्वी प्रयोगही झाले आहेत. निसर्ग आणि माणूस ह्यांचा संबंध विलासी रसिकतेने जोडण्यात केवळ संगीत आणि चित्रकलाच नव्हे तर स्थापत्यकलाही समाविष्ट झाली होती. मध्यप्रदेशातल्या सुलतान घियास-उद्दीन खिलजीने बांधलेली 'जहाज महाल' ही मांडूतील इमारत पाहावी तर पावसाळ्यात. तिची रचना करताना दोन्ही बाजूचे विस्तीर्ण तलाव, महालाचा जहाजासारखा आकार, भोवतालचा हिरवागार परिसर, महालातले दिवे, त्यांचा शुभ्र घुमटावर पडणारा आणि तिथून परावर्तित होणारा प्रकाश, रंगीत आरशांतून त्याचे झालेले परावर्तन, सभोवताली चाललेले निसर्गनिर्मित आणि मानवनिर्मित संगीत, धारानृत्य आणि मानवी नृत्याच्या एकमेकांत मिसळणाऱ्या कमनीय रेषा असा देखावा आतापर्यंत कोणत्याही देशातल्या कोणत्याही सिनेदिग्दर्शकाने कल्पिला नाही. निसर्गस्थापत्याचे हे एक श्रेष्ठ उदाहरण आहे. हिंदू आणि मुस्लिम संस्कृतींच्या संगमाचा, तसेच मानव आणि निसर्ग ह्यांच्या मिलापाचा हा एक उच्च बिंदू आहे. तो कलांच्या परस्परसंबंधातून निर्माण होणाऱ्या सौंदर्यदृष्टीचाही सन्माननीय टप्पा आहे.

**मानवकेंद्रित कला आणि सर्वव्यापी कला**

आईझेन्स्टाईन आणि इतर पाश्चात्त्य कलाविद यांच्या विचारातला एक अत्यंत महत्त्वाचा फरक म्हणजे, क्वचित एखादा अपवाद वगळता, इतर सर्वांचे विचार मानवकेंद्रित आहेत. तशीच युरोपाची कलाही मानवकेंद्रित आहे. अर्थात यात आश्चर्य करण्यासारखे काही नाही. बायबलची सुरुवातच पाहा ना :

"And God said, Let us make man in our own image, after our likeness : and let them have dominion over the fish of the sea, and over the fowl of the air, and over the cattle and over all the earth, and over every creeping thing that upon the earth." (Genesis, 1.26)

'ग्रंथावर' आधारित असलेले तीन मुख्य धर्म म्हणजे यहुदी, ख्रिस्ती धर्म आणि इस्लाम. ह्या तिन्हीत माणसाला जगाचे केंद्र मानले आहे. उद्धृत वाक्याचा सरळ अर्थ केला तर जग हे माणसाच्या उपभोगाकरता केलेले आहे. आज विज्ञानाच्या वाढत्या शक्तीमुळे माणसाने निसर्गात जी उलथापालथ केली त्याचे परिणाम कदाचित पृथ्वीवरचे सर्व जीवन नष्ट होण्यात होईल. त्या उलट हिंदू धर्मात ईश्वराचे जे अवतार मानलेले आहेत त्यांचा क्रम पाहिला तर तो मत्स्य, कूर्म, वराह, नृसिंह, वामन, परशुराम, राम, कृष्ण, बुद्ध, कल्की असा आहे. त्यातले पहिले मत्स्य हे पाण्यात निर्माण झालेले जीवन, पाणी आणि जमीन यांना साधणारे कासव, नंतर पशू, त्यानंतर अर्ध-मानव, अर्ध-पशू मग मानव असा उत्क्रांतीच्या आलेखासारखा क्रम दिसून येतो. बुद्धाच्या जातकात तो तथागत होईपर्यंत त्याला किती प्रकारच्या जीवनाचा अनुभव घ्यावा लागतो! त्यामुळे बौद्ध आणि हिंदू शिल्पांत आलेल्या निसर्गाच्या चित्रणात प्राणी आणि वनस्पती

जीवनाच्या अनेक रसरशीत लयी आहेत, रेषांची अनेक वळणे आहेत, वनस्पती आणि प्राणी ह्या दोन्हींच्या शिल्पात आणि चित्रात स्नायूंच्या तपशिलाऐवजी प्राणाने आणि जीवद्रव्याने भरलेले मोहक फुगवटे आहेत.

भारतीय कलेत आणि संतवाङ्मयात एकूण जीवनाविषयी जी अनुकंपा आहे तिचे वर्णन करायला मी ज्ञानेश्वरांचे शब्द उसने घेतो :

अरुण आंगाजवळिके । म्हणौनि सूर्यातें देखे ।
मा भूतळींची न देखे । मुंगी काई ।। (ज्ञानेश्वरी १८.१७१९)

अरुण सूर्याच्या जवळ आहे म्हणून तो सूर्याला पाहतो, पण भूतळीची मुंगी त्याला पाहू शकत नाही, असे थोडेच आहे?

आईझेन्स्टाईन यांनी वॉल्ट डिस्नेवर जे लेखन केले त्यात ज्ञानेश्वरांना शोभेशी करुणा आहे. डिस्नेकडे पाहण्याचा त्यांचा दृष्टिकोन हा डिस्नेकडे ज्याप्रकारे पाहिले जाते त्यापेक्षा सर्वस्वी वेगळा आहे. डिस्नेला ते आदिम कालापासून चालत आलेल्या एका परंपरेचा विसाव्या शतकातील प्रतिनिधी समजतात. ही परंपरा म्हणजे कल्पनाशक्तीला कोणताही लगाम न घालता, वास्तवाच्या कोणत्याही मर्यादा मान्य न करता कल्पित जग तयार करणाऱ्यांची परंपरा आहे. त्यात झाडे गातात, पशू बोलतात, गुरुत्वाकर्षणाचे, कार्य-कारणाचे कोणतेही भौतिक नियम ह्या जगांला लागू होत नाहीत. ॲनिमेशनसाठी मी सजीवीकरण असा शब्दप्रयोग वापरतो. ह्या सजीवीकरणाने निर्माण केलेला विसाव्या शतकातला सर्वात मोठा सिनेतारा म्हणजे मिकी माऊस. वॉल्ट डिस्नेची सिने-फॅक्टरी होण्यापूर्वी त्याच्या कलेत एक सुर-रिअल कल्पनाशक्ती होती. त्याच्या संगीतावरच्या 'डान्स मकाबर' ह्या लघुचित्रपटात सापळे आपल्या शरीरालाच वाद्ये बनवून संगीत निर्माण करतात. प्राण्यांची शरीरे, वस्तू साफ चपट होतात. त्यांचे रूपपरिवर्तन होते. तसेच ती त्रिमिती जगातून द्विमिती जगात जातात किंवा द्विमिती जगातून त्रिमिती जगात येतात. याबद्दल आईझेन्स्टाईन यांचे विवेचन मार्मिक आणि सखोल आहे. ते थोडक्यात असे :

अमेरिकन जीवनाच्या फोर्डीझमपासून झालेल्या यांत्रिकीकरणामुळे सजीव माणूस निर्जीव यंत्राप्रमाणे वागू लागला. विशिष्ट हालचाली विशिष्ट पद्धतीने विशिष्ट वेळेत करण्याच्या गरजेतून होणाऱ्या यांत्रिकीकरणाचे चॅप्लिनने 'मॉडर्न टाईम्स'मध्ये उत्तम चित्रण केले आहे. डिस्नेची कला म्हणजे या यांत्रिकीकरणाविरुद्ध अनिर्बंध प्रतिभेने केलेले बंड आहे. आणि सिनेमा हे त्याचे माध्यम आहे. ला फोंतेनच्या सतराव्या शतकातील फेबल्स ह्यादेखील त्या शतकातील जगाकडे आणि माणसाकडे यंत्र म्हणून बघणाऱ्या तत्त्वज्ञानाला आणि आचरणाला दिलेले आव्हान आहे.

ला फोंतेनच्या कथा इसापच्या गोष्टींवरून आल्या. इसापच्या गोष्टी हितोपदेश आणि पंचतंत्रावरून आल्या आणि पंचतंत्राचे मूळ जातक कथा आहेत. हा इतिहास जवळजवळ

सर्वश्रुत आणि सर्वमान्य आहे. ज्याप्रमाणे आईझेन्श्टाईन डिस्नेचा आणि अमेरिकन समाजाचा संबंध जोडतात, त्याचप्रमाणे आपल्यालाही जातक कथांचा तत्कालीन इतिहासाशी संबंध स्पष्ट दिसतो. वैदिक संस्कृती ही गोपालनाच्या काळात निर्माण झाली. एका प्रमाणाबाहेर झालेल्या पशूंच्या पालनासाठी तो समाज असमर्थ होता. त्यातून यज्ञाकरता पशूंचा वध करण्यात येत असे. पुढे या संस्कृतीचे कृषिप्रधान संस्कृतीत रूपांतर होताना पशूंची गरज वाढली; तसेच त्यांच्या संवर्धनाची व्यवस्था करता येणे शक्य झाले होते. त्यातून अहिंसेच्या कल्पनेवर आधारित अशा जैन आणि बौद्ध धर्मांचा प्रसार झाला. अर्थात ही अगदी सोपी केलेली शृंखला आहे. त्यात इतर बाजू विचारात घेणे आवश्यक आहे. पण मूळ मुद्दा हा आहे. जातककथा संस्कृतात नसून त्या पालीत होत्या. त्यांचे स्वरूप लोककथांच्या जवळचे होते. वैदिक धर्मातल्या संस्कृतमध्ये बंदिस्त असणाऱ्या आध्यात्मिक ज्ञानाच्या मक्तेदारीला त्यांनी आव्हान दिले आणि बौद्धधर्माचा प्रसार वाढू लागला. त्यांची शिल्पे झाली. चित्रे झाली, गुहा झाल्या, स्तूप झाले. जसे हॉलिवुडच्या चित्रपटांनी अमेरिकन संस्कृतीला जगभर पसरायला मदत केली, तशीच जातककथांनी आणि रामायण आणि महाभारत ह्या काव्यांनी केली. मला इंडोनेशियात प्रेम्बानंद आणि बोरोबुदूर इथे शूटिंग करताना हे प्रकर्षाने जाणवले. ह्या मुस्लिम देशात रामायणातील जटायूचे पंख कापल्याचा प्रेम्बानंदच्या देवळातल्या नृत्यनाट्याचा प्रवेश पाहताना मला जो उत्कट अनुभव आला त्या वेळी माझ्या डोळ्यात कधी न येणारे पाणी तरळले. वैश्विक पातळीवर पोचलेली, धर्माच्या आणि देशांच्या सीमांपलीकडे जाणारी, एका गिधाडासारख्या पक्ष्याबद्दल अशा प्रकारची सहानुभूती आणि त्याच्या हालांचे आणि मृत्यूचे दु:ख, क्रौंचवधातून महाकाव्य निर्माण करणारा वाल्मिकीच करू जाणे!

डिस्नेच्या उत्कृष्ट चित्रपटांचे जातककथा रचणाऱ्या भारतीय कल्पनाशक्तीशी जवळचे नाते आहे. आईझेन्श्टाईन यांनी मार्ग दाखवल्यामुळे आज ते स्पष्ट दिसते. भारतात ही परंपरा जाणवलेला एक महान दिग्दर्शक म्हणजे ऋत्विक घटक. त्यांच्या 'अजांत्रिक' या चित्रपटातले महत्त्वाचे पात्र म्हणजे जिला मालक सजीव व्यक्तीसारखी वागवतो अशी टॅक्सी. निसर्गाशी तादात्म्य असणाऱ्या संथाल संस्कृतीची पार्श्वभूमी वापरून केलेला हा चित्रपट म्हणजे एक प्रेमकथा आहे. तिची नायिका आहे एक टॅक्सी. तिचा नायक हा एक टॅक्सी ड्रायव्हर आहे. ह्या जुनाट टॅक्सीचे लवकरच ओढवणारे मरण इतर सर्वांना दिसते आहे; पण तो ते मानायला तयार नाही. टॅक्सीतून येणाऱ्या यंत्राच्या आवाजांना, विविध प्रसंगांना आणि भावनांना अनुरूप अशा वेगवेगळ्या लयीच्या, स्वरांच्या आणि पोताच्या ध्वनीने सजवून जे अर्धे हास्यमय आणि अर्धे शोकमय जग तयार केले आहे; ते भारतीयच नव्हे तर जागतिक चित्रपटातील सहृदयतेचा एक मानबिंदू आहे. ह्या चित्रपटाचा रशियातला पहिला शो, चेर्नोबिलच्या प्रचंड अपघातानंतर आईझेन्श्टाईन

म्युझिअमचे संचालक नाऊम क्लेमन आणि मी मॉस्कोत आयोजित केला होता. निसर्गावर मात करण्याच्या चढाईखोर वृत्तीतून निर्माण झालेली संहारक पाशवी शक्ती आणि यंत्राकडे प्रेमाने बघणारा माणूस ह्यांच्यातल्या विरोधाने तिथे असलेल्या काही प्रेक्षकांचे डोळे पाणावले.

आईझेन्श्टाईन ह्यांच्या 'बॅटलशिप पोटेमकिन' या चित्रपटाच्या शेवटी बोटीच्या इंजिनाच्या- हालचालींचे त्यांनी जे चित्रण केले आहे, त्यात खलाशांच्या धडधडत्या हृदयाचा प्रतिध्वनी ऐकू येतो. आजही हा चित्रपट पाहताना प्रेक्षकांच्या हृदयात ती धडधड परत होते.

**गर्भाशयातले जीवन आणि जन्माचे नाट्य**

स्त्रीबीज फळल्यापासून दोन पायावर चालता येण्यापर्यंतच्या कालात, हे बीज उत्क्रांतीच्या अवस्था फास्ट-फॉरवर्ड करते आणि तिची लाखो वर्षांची मिनिएचर प्रतिकृती तीनेक वर्षात जगून जाते. ह्या कालातीत अनुभवाचा, इंद्रियांच्या निर्मितीचा, ज्ञानेंद्रियांच्या वाढीचा, मानेचा तोल आणि नंतर शरीराचा तोल सांभाळण्याचा, रांगण्याचा, पडतझडत चालण्याचा इतका मोठा अनुभव जसजसा मेंदूचा विकास होत जातो, तसतसा आपण विसरत जातो. एक दिवस तो इतका विसरतो की तो साफ पुसला जातो. मात्र तो आपल्या पेशीपेशीत भिनलेला असतो. आपले शरीर तो अनुभव विसरत नाही. ह्या अनुभवाला कलांच्या सर्जनात आणि ग्रहणात फार महत्त्व आहे. सर्कससारख्या काही कला या समाईक अनुभवामुळे आबालवृद्धांना प्रिय असतात. सर्कशीतले खरे कथानक असते संपूर्ण उत्क्रांतीचा व मनुष्य आणि प्राणी ह्यांच्या परस्परसंबंधाचा इतिहास.

गर्भाशयाच्या द्रवात आपल्या शरीराच्या गरजा आपोआप पुऱ्या केल्या जातात. तहान नसते, भूक नसते, वजनविरहित अवस्थेत आपण तरंगत असतो. गर्भाशयाचा गोल हाच आपला आकाशगोल असतो, भू-गोल असतो. कारण माता ही पहिली धरणी असते. त्यामुळे स्वर्गाच्या कल्पनेत देवगण उडतात. अमृताचे पान केल्यावर सर्व तहानभुकेच्या गरजा संपतात. 'अमरा निर्जरा' अशा अवस्थेला माणूस पोहोचतो.

आईझेन्श्टाईन ह्यांच्या माणसाच्या जीवनाच्या सुरुवातीच्या कालाबद्दलच्या विचारांचा हा एक जलद आढावा आहे. कलेतली समतोलाची कल्पना, सिनेमातील क्रेन शॉटचा गुरुत्वाकर्षणावर मात करणारा उडण्याचा अनुभव, लयीचा अनुभव ह्या अनेक गोष्टी शरीराच्या स्मृतीत असलेल्या गोष्टी परत जाग्या करतात. त्यामुळे ह्या अनुभवाला नकळत अनेक स्तर येतात आणि ते आपल्या अस्तित्वाच्या तळापर्यंत पोचलेले असतात. शरीराला असलेली आणि बुद्धीला किंवा अंतर्मनालाही नसलेली स्मृती हा विचार पाश्चात्त्य विचारवंतांमध्ये विरळा आहे. फ्राईडही जन्माच्या आणि जन्मानंतरच्या अनुभवाकडे जातात. युंग समष्टीच्या स्मृतीकडे जातात. व्हिगॉट्स्की आणि झ्याँ पिआझेदेखील

जन्मानंतरच्या बुद्धिविकासाचे विश्लेषण आणि अभ्यास करतात. पण बीज फळल्यापासूनच्या आयुष्याचा कलेशी संबंध लावणारा आईझेन्स्टाईन ह्यांच्याखेरीज दुसरा तरी पाश्चात्त्य विचारवंत मला माहीत नाही.

आता भारताकडे येऊ या. शारंगदेवाने रचलेला 'संगीतरत्नाकर' संगीताच्या चर्चेची आणि विवेचनाची सुरुवात करतो तीच मुळी बीजफलनापासून गर्भाची वाढ कशी होते, विविध ज्ञानेंद्रिये कोणत्या क्रमाने निर्माण होतात ह्याच्या वर्णनातून. त्याचे मी येथे सारांशाने मराठीकरण देतो. ग्रंथाच्या संपादकाच्या नोंदीही इथे समाविष्ट केल्या आहेत.

शारंगदेवाला असं सुचवायचंय की गर्भाला शौर्य किंवा भित्रेपणा ह्या मानसिक अवस्था असतात... चौथ्या महिन्यानंतर गर्भाला जाणीव निर्माण होते आणि तो अनुभवाकरता आतुर होतो.

'गर्भाचे हृदय हे मातेच्या हृदयावर जाते. इथे हृदय शब्दात बुद्धी, भावना, इच्छा ह्या साऱ्या गोष्टी समाविष्ट आहेत... गर्भाचे हृदय आणि मातेचे हृदय ही जुळ्यासारखी जुळलेली असतात. त्यामुळे गर्भवतीला दोहदा असे म्हणतात. कारण तिला दोन हृदये असतात. त्यामुळे तिच्या इच्छांनाही दोहदा म्हणतात.'

ह्या गर्भाशयातल्या अनुभवाची पुनरावृत्ती करणारा अनुभव मला येथे वानगीदाखल द्यायचा आहे. मात्र हा प्राचीन भारतीय कलेतला नसून अलीकडचा, भारतात जन्मलेल्या अनिश कपूर ह्या जगप्रसिद्ध दृक्कलाकाराच्या एका रचनेचा आहे. त्यांच्या कामात भारतीय कलेशी आणि तसेच सुप्त मनाशी असणारे दुवे हे नकळत खोलवर जाणारे आहेत. पॅरिसमध्ये ग्रां पाले ह्या म्युझिअममध्ये त्यांनी 'लेविआथन' हे भव्य शिल्प रबराईझ्ड प्लास्टिकसारख्या दिसणाऱ्या एका पदार्थापासून केले आहे. त्याच्या अनुभवाचे मी इथे वर्णन करतो :

*एका अरुंद काळोख्या द्वारातून ह्या शिल्पात प्रेक्षक प्रवेश करतो. बाहेरच्या मानाने आत प्रकाश अगदी कमी असल्यामुळे डोळे सरावल्याखेरीज काहीच दिसत नाही. हळूहळू धुगधुगत्या तांबड्या प्रकाशात तीन प्रचंड बोंडे दिसू लागतात. त्यांचे पोत ताणलेल्या त्वचेसारखे दिसतात. त्यांच्यावरच्या रेषा रक्तवाहिन्यांची आठवण करून देतात. बोंडांच्या पॅराबोलिक आकारामुळे आणि जशी दृष्टी खोल जाते तसतशा कमी होणाऱ्या प्रकाशामुळे ती अंतहीन वाटतात. मधले बोंड हे एका महायोनीसारखे किंवा डार्क होलसारखे आपली दृष्टी शोषून घेते. रक्तवाहिन्यांसारख्या रेषा आकर्षणक्षेत्राच्या ऊजरिषा असल्याचा भास होतो. प्रेक्षकाला एखाद्या महामातेच्या गर्भाशयात असल्यासारखे वाटते. गर्भस्थितीत आईच्या शरीरातून बाहेरच्या दिसणाऱ्या प्रकाशाचा प्रत्येकाने घेतलेला; पण विसरलेला अनुभव शरीराला कवटाळून जागे करतो. देवळातल्या गर्भगृहातल्याप्रमाणे इथे मिणमिणता प्रकाश आहे; पण दर्शनाला मूर्ती नाही. जणू हे अमृताचे दर्शन आहे.*

ह्या अंधारातून बाहेर पडून एका विमनस्क अवस्थेत प्रेक्षक जेव्हा बाहेर येतो तेव्हा त्याला त्या बोंडांचा बाहेरचा भाग दिसतो. गिळून टाकणाऱ्या काळोख्या अवकाशाचे आता प्रचंड पर्वतप्राय बहिर्गोल पॅराबोलात आणि पुष्ट गोलात रूपांतर होते. गलिव्हरच्या शरीराभोवती लिलीपुटिअन्स जमावे तशी भोवतालची माणसे भासू लागतात. पुष्ट गोलाकारांनी तान्ह्या बालकाला आईच्या शरीराचा जसा अनुभव येत असावा तसा भास होऊ लागतो. स्मृतीच्या पूर्वेतिहासातल्या शारीरिक स्मृती जागृत होतात. ह्या गोलांपासून आपण दूर जाऊ शकतो; पण ते स्पर्शाला आवाहन देऊन परत आपल्याकडे खेचतात. मग दृष्टी आपल्याला दूर बोलावते, कारण तिला ते गोलाकार डोळ्यात सामावून घेण्याचे सुख हवे असते. शिल्पाच्या स्थिर बिंदूभोवती स्पर्श आणि दृष्टी ह्या दोन टोकांत लंबकाच्या आंदोलनासारखा प्रेक्षक हेलावत राहतो.

अशा प्रकारच्या अनुभवाचे आईझेन्श्टाईन ह्यांनी आपल्या 'रोदँ ए रिल्क' ह्या निबंधात विश्लेषण केले आहे, ते असे : 'हा प्रश्न धन आकार आणि ऋण आकार ह्यांच्या आरशातल्या प्रतिबिंबांच्या परस्परसंबंधांचा आहे. इथे बहिर्गोल आणि अंतर्गोल या आकारांचे एकत्व आहे. बहिर्गोल आकार डोळ्यांनी जाणवतो. अंतर्गोल आकार हा आतून स्पर्शाने जाणवतो. अर्थातच ह्या दोन्ही प्रकारच्या अनुभवाचे एकत्व हा अनुभवाचा आदर्श मार्ग आहे.'

'दृष्टीला स्तन बहिर्गोल असतो आणि स्तनाभोवतालचा त्याचा सुखद स्पर्श घेणारा हात हा अंतर्गोल असतो. त्यामुळे स्पर्श आणि दृष्टी एकमेकाला पूरक अनुभव देतात.'

अनिश कपूर यांच्या 'लेव्हिआथन'ला तंतोतंत लागू होणारे हे विधान आईझेन्श्टाईन यांनी पिकासोच्या समुद्रकिनाऱ्यावर असणाऱ्या स्त्रियांच्या बहिर्गोलाकार चित्राबाबत आणि त्याच कालात क्युबिस्ट शैलीत काढलेल्या स्त्रियांच्या अंतर्गोल चित्रांबद्दल सुमारे आठ दशकांपूर्वी केले आहे. 'लेविआथन'मध्ये जणू काही दर्शकाला नॉन-युक्लिडीअन भूमितीच्या एलिप्टिक आणि हायपरबोलिक अवकाशांचा एकाच वेळी अनुभव मिळतो. अनिश कपूर यांनी प्रेक्षकांना महामातेचा एक अंतर्बाह्य आणि वैश्विक अनुभव 'लेव्हिआथन'मध्ये देऊ केला आहे.

**उन्मादावस्था**

आईझेन्श्टाईन यांच्या ग्रंथांची शेकडो पाने आणि चित्रकलेच्या वहीची पानेच्या पाने उन्मादावस्थेवरचे लेखन आणि तिचे चित्रण करण्यात भरून गेली आहेत. लैंगिक उन्माद, मादक आणि अमली पदार्थांपासून येणारा उन्माद ते मिस्टिकल अनुभवापर्यंत, उन्मादाच्या सर्व अवस्थांबद्दल त्यांनी विचार मांडले आहेत. मेक्सिकोत असताना त्यांनी अशा प्रकारचे अनुभव घेतले असावेत असे त्यांच्या वर्णनाच्या उत्कटतेतून वाटते. अर्थात त्यांच्या विशाल कविमनाने 'रवीने पाहिले नाही असे काही आपल्या प्रतिभेने पाहिले असावे', ही एक

शक्यता आहे. त्यांच्या लिखाणाला शैव तांत्रिक दार्शनिकांचा गंध आहे. ते उन्माद शब्दाचे स्पेलिंग इंग्रजीत लेखन करताना नेहमी Ex-stasis असे करतात. कारण त्यात अनुभव घेणारा स्वत:बाहेर पडतो, स्वत:ला विसरून आणि हरवून जातो.

उन्मादावस्थेचे विश्लेषण करताना आईझेन्श्टाईन यांनी तिच्या अनेक बाजू विचारात घेतलेल्या आहेत. शरीराला येणारी वक्रता, डोळे तारवटणे आणि त्यातून दृष्टिक्षेत्राची खोली वाढून वाईड-अँगल लेन्सप्रमाणे डोळ्यासमोरच्या अगदी जवळच्या गोष्टींपासून अगदी दूरपर्यंतच्या सर्व गोष्टी रेखीवपणे दिसणे, दिव्य वाटणारा पण प्रत्यक्षात कोणत्याही वस्तूपासून न येणारा प्रकाश, विविध रंग आणि आकृती दिसणे, कालाचे आणि अवकाशाचे एक नेहमीच्या अनुभवापेक्षा वेगळे भान निर्माण होणे; या सर्व गोष्टींचा त्यांनी विचार केला आणि त्याचे विश्लेषण करून त्याचा सौंदर्यानुभवाशी संबंध जोडला.

मी आईझेन्श्टाईन यांच्या विचारांना शैव दार्शनिकांचा गंध येतो, असे म्हटले आहे; ते सकारण आहे. आनंदवर्धन आणि अभिनवगुप्त यांच्या विचारांत आणि आईझेन्श्टाईन यांच्या विचारांत अनेक साम्यस्थळे आहेत. हे दोघे तत्त्ववेत्ते काश्मिरी तांत्रिक शैव आहेत. ह्यांच्या विचारासंबंधी प्रख्यात इटालिअन विद्वान रानिएरो नॉली ह्यांनी भाष्य केले आहे, ते असे : 'शैव तत्त्ववेत्यांची सौंदर्यशास्त्राची तर्कपद्धती आणि वैचारिक बैठक आध्यात्मिक विचारधारेच्या काठाकाठाने बांधली होती. त्यामुळे आध्यात्मिक अनुभव आणि सौंदर्यानुभव ह्यांतला फरक आणि परस्परसंबंध दोन्ही त्यांनी विचारात घेतले होते. सौंदर्यानुभवाचे वैशिष्ट्य म्हणजे तो भोगणारा सौंदर्यवस्तूत विलीन होते. त्या वस्तूच्या अनुभवाखेरीज त्याला कशाचेही भान नसते. त्याच्या दैनंदिन जीवनाला तात्पुरती खीळ घालून तो सौंदर्याच्या उन्मादाचा अनुभव घेतो. त्यामुळे तो अनुभव ब्रह्माच्या अनुभवासारखा असतो. उन्माद लैंगिक असो, सौंदर्यानुभवाचा असो किंवा गूढानुभवाचा असो, तो घेणारा स्वत्व पूर्णपणे विसरून जातो. 'प्रेक्षकाला दैनंदिन जीवनात असणाऱ्या कोणत्याही उपयुक्ततावजा वैयक्तिक गरजा उरत नाहीत. त्या साऱ्यांना दूर सारून तो सौंदर्यानुभवात मग्न होतो. काव्याने होणाऱ्या साधारणीकरणामुळे त्याच्या 'अहं'चा कोष गळून पडतो आणि त्यामुळेच त्याच्यावर असणारी नैमित्तिक जीवनाची बंधनेही नाहीशी होतात.'

योग्याला होणारा ब्रह्मानंदही आप-पर भाव नष्ट करतो. म्हणून रसातून मिळणाऱ्या आनंदाचे वर्णन भट्ट नायक हा तत्त्वज्ञ ब्रह्मानंदसहोदर असे करतो. तो म्हणतो की, जसा गाईला ममतेने आपोआप पान्हा फुटतो तशी शब्दामुळे होणारी रसनिर्मिती सहज होते. ती योग्यांनी कष्टाने पिळून काढलेल्या दुधापेक्षा वेगळी असते हा ब्रह्मानंदातला आणि त्याच्या जुळ्या भावातला सौंदर्यानंदातला फरक आहे.१ (नॉली, पृ० ५६)

हा आनंद घेणारा रसिक 'सहृदयिन्' असावा लागतो. 'सहृदयिन्' कुणाला म्हणावे? अभिनवगुप्त म्हणतो, 'जो सौंदर्यविषयात पूर्णपणे मग्न होऊ शकतो, जो आपल्या मनाचा

आरसा काव्याच्या नित्य अभ्यासामुळे घासूनपुसून कायमचा चकचकीत ठेवू शकतो आणि त्यात तो कवीच्या हृदयाचे हुबेहूब प्रतिबिंब बघू शकतो तो खरा सहृदयिन्.' आता सिनेमाचा आदर्श प्रेक्षक कसा असतो ह्याची आईझेन्श्टाईन यांची व्याख्या पाहू. ती अशी : 'निर्मात्याच्या अंतर्दृष्टीसमोर त्याच्या भावनांनी रंगलेली एक इमेज असते. ती त्याच्या विषयाचे भावनिक स्वरूप असते. निर्मात्याचे काम म्हणजे या इमेजचे दोनतीन अंश एकत्रित करून त्यांच्या एकत्वामुळे प्रेक्षकाला त्यांचा पुन:प्रत्यय येईल अशी रचना करणे. त्यामुळे निर्मात्याच्या मनात तरंगत असलेली इमेज आणि तिच्याबरोबर जोडलेल्या भावना ह्या दोहोंचा प्रेक्षकाला अनुभव येतो. ...निर्मात्याला निर्मितीच्या ज्या रस्त्याने जायला लागले त्याच रस्त्याने प्रेक्षक जातो.'

**दूरचे प्रतिध्वनी**

आईझेन्श्टाईनना जपानी, चिनी, मेक्सिकन, प्री-कोलंबिअन, युरोपीय इ० अनेक संस्कृतींचे प्रगाढ ज्ञान होते. मात्र त्यांचा भारतीय संस्कृतीचा विशेष अभ्यास नव्हता. पण तरीही इतक्या दूरचे प्रतिध्वनी त्यांच्यापर्यंत पोचले. या व्याख्यानाला दिलेले 'दूरचे प्रतिध्वनी' हे नाव ही केवळ एक इमेज नाही. त्यात एक वेगळा अर्थ मला अभिप्रेत आहे. आनंदवर्धनाचा मुख्य ग्रंथ म्हणजे 'ध्वन्यालोक'. त्यावरचे अभिनवगुप्ताचे भाष्य म्हणजे 'लोचन'. त्यांच्या दोघांच्या लेखनातील सर्वात महत्त्वाची संकल्पना ही ध्वनीची आहे, विशेषत: रसध्वनीची. ती विस्ताराने मांडण्याचा हा प्रसंग नाही. पण ती विषयानुरूप थोडक्यात सांगतो. शब्दांच्या ज्या तीन शक्ती मानल्या आहेत त्या म्हणजे अभिधा, लक्षणा आणि व्यंजना. शब्दाचा सरळ, वाच्यार्थ सांगणारी शक्ती अभिधा, शब्दार्थाच्या पलीकडचा पण तत्संबंधित गर्भित अर्थ जिच्यायोगे बोधित होतो ती शक्ती म्हणजे लक्षणा आणि ह्या दोन्हीपलीकडे असणारा अर्थ सूचित करणारी शक्ती म्हणजे व्यंजना होय. घंटेचा टोला पडला की, पहिल्या आघाताचा नाद नष्ट झाला तरी त्याचे एकामागून एक येणारे पडसाद आपल्याला ऐकू येतात. तसेच काव्यात शब्दाचा वाच्यार्थ प्रथम लक्षात येतो, त्यानंतर त्याभोवती तरंगणारा लक्ष्यार्थ लक्षात येतो आणि शेवटी जो अर्थ सूचित होतो त्याला सौंदर्यशास्त्रकारांनी 'ध्वनी' म्हटले आहे. ह्या ध्वनीलाच ते काव्याचा आत्मा मानतात. हा एकप्रकारे दूरचा पडसाद आहे.

आईझेन्श्टाईन ह्यांच्या मोंताझच्या संकल्पनेत एका शॉटचा दुसऱ्या शॉटवर आघात झाला की त्यातून दोन्ही शॉटमध्ये असणाऱ्या दृश्यापलीकडचा अर्थ सूचित होतो असे प्रतिपादिले आहे. त्यांचे मोंताझच्या प्रकारांचे विवेचन आणि ध्वनीच्या अनेक प्रकारांचे विवेचन ह्यात विलक्षण साम्यस्थळे दिसतात. ते ज्या संकल्पनांचा वापर करतात त्यात आणि ध्वनीच्या कल्पनेत केवळ वैचारिक साम्य नसून त्याची शब्दरचनाही सारखी आहे. शॉटच्या रचनेतून जो सरळ बोध होतो त्याला ते 'इवोन' असा शब्द वापरतात. हा

शब्द एखाद्या घंटेवर आघात केला तर जो नाद उत्पन्न होतो त्याकरता वापरतात. तो नाद मनात तरंगत राहिल्यावर ज्या लहरी उमटत राहतात तो नाद मूळ नादापासून उत्पन्न होत असला तरी त्यापासून वेगळा असतो. ह्या मनात उमटत राहणाऱ्या नादाला ते 'प्येरीइवोन' असा शब्दप्रयोग वापरतात. हा शब्द दूरचा प्रतिध्वनी किंवा विरत जाणारी आस सूचित करतो. ध्वन्यालोकाचे रचनाकार आणि लोचनकार हे दोघेही वैयाकरणांच्या स्फोटांच्या कल्पनेचा आधार घेतात. आपण 'कमल' हा शब्द उच्चारतो तेव्हा त्याचा पूर्ण उच्चार झाल्याशिवाय अर्थबोध होत नाही. आपल्या कानावर प्रथम 'क' पडतो, तो विरून जातो, तेवढ्यात 'म' पडतो आणि 'ल' कानावर पडल्यानंतर 'कमल' ह्या अर्थाचा स्फोट होतो. असेच शब्दाचे वाच्यार्थ, लक्ष्यार्थ मनात तरंगत असता असता जो अर्थ सूचित होतो तो 'ध्वनी' असे ते मानतात. तो एका अर्थी स्फोटच असतो.

'ध्वन्यालोक' या ग्रंथाचे नावच सिनेमाच्या किती जवळ आहे! ध्वनी (वाच्यार्थाने, लक्ष्यार्थाने आणि व्यंग्यार्थाने) आणि आलोक हा सिनेमाचा आधार आहे. तेव्हा ध्वन्यालोकाच्या संकल्पना आणि सिनेमातील सर्वश्रेष्ठ विचारवंताच्या संकल्पना ह्यांच्या आकर्षणरेषा एकमेकांत गुंफल्या तर त्यात केवळ योगायोग नाही, तर त्रिकालाबाधित सत्याची शाश्वती आहे.

आनंदवर्धनाचा काल सुमारे नवव्या शतकातला मानतात. अभिनवगुप्ताचा काल हा दहाव्या शतकाच्या शेवटी आणि अकराव्याच्या सुरुवातीला असा मानतात. हे दोघेही काश्मीरचे. आईझेन्स्टाईन ह्यांचा जन्म रशियात १८९८ साली झाला आणि मृत्यू १९४८ मध्ये झाला. हे तिघेही कालात आणि स्थलांच्या अंतरात परस्परांपासून दूर होते. त्यांनी तिघांनी ज्यावर विचार केला त्या कला अनुक्रमे काव्य आणि सिनेमा ह्या होत्या. एक आदिम कला आणि दुसरी तंत्रावर आधारित विसाव्या शतकातील कला. त्रिकालाबाधित सुंदर सत्याला स्थलकालाच्या मर्यादा नाहीत. त्याचे दूरचे प्रतिध्वनीदेखील सतत ऐकू येत असतात. ते ऐकू येण्याकरता मन आतुर असावे लागते, चित्त एकाग्र व्हावे लागते. ते ऐकू आल्यावर जी स्थिती होते तिच्या वर्णनाकरता मराठीत दुसऱ्या कुणाचे शब्द मी उसने घेऊ शकतो? तेव्हा ज्ञानेश्वरांच्या शब्दांत इथे समारोप करतो.

आइकां रसालपणाचेया लोभा । किं श्रवणींचि होति जीभा ।
बोलें इंद्रिया लागे कळंभा । एकमेकां ॥ (६.१६) आणि शेवटी

जेथ संपूर्ण पद उभारे । तेथ मनचि धांवे बाहिरें ।
बोलु भुजांही आविष्करें । आलिंगावया ॥ (६.१९)

**संदर्भ :**

१. The Aesthetic Experience According to Abhinavgupta by Raniero Gnoly, Serie Orientale Roma XI, Roma, Is, M.EO.1956 ■

# भाषांतर-व्यवसायाच्या संधी आणि भवितव्य

विजय पाध्ये

मी गेली काही वर्षं व्यावसायिक भाषांतरकर्मी म्हणून, आणि विशेष करून वैद्यक क्षेत्रातील भाषांतरकर्मी म्हणून काम करीत आहे. पुस्तकप्रकाशनाच्या व्यवसायात असलेल्या कुटुंबात मी जन्मलो, वाढलो. घरातल्या व्यवसायामुळे लेखक-संपादक-प्रकाशक-मुद्रक-मुद्रितशोधक-चित्रकार ह्यांचं मला जे सान्निध्य लाभलं त्याचा आपल्या भाषेवर संस्कार घडण्याचा लाभ मला झाला. नोकरीतील पहिली चोवीस-एक वर्षे अभियांत्रिकी क्षेत्रात काढून झाल्यावर पुढील आठ वर्षे औषधनिर्माण क्षेत्रात मी नोकरी केली. ही दोन्ही क्षेत्रं अगदी विभिन्न असली तरी माझं कामाचं स्वरूप प्रशासकीय व वैयक्तिक साहाय्यक असं होतं व त्यात भाषांचाच उपयोग प्रामुख्यानं करीत होतो. पुढे पल्मनरी एम्बॉलिझमचा विकार उद्‌भवल्यानं वयाच्या पन्नासाव्या वर्षी माझी नोकरी अचानक संपुष्टात आली व योगक्षेमासाठी पर्यायी संधी मला शोधणं भाग पडलं. आता गेली तेरा-चौदा वर्षंतरी अभियांत्रिकी, मनुष्यबळ विकसन ह्या क्षेत्रांतल्या, तसंच वैद्यक क्षेत्राशी संबंधित विषयांतील भाषांतरकर्मी म्हणून मी काम करीत आहे. इंग्रजी व मराठी ह्या दोनच भाषा मला बऱ्यापैकी अवगत असून तेवढ्याच मर्यादेत मी काम करतो. संस्कृत भाषा मला आवडते, मी अधूनमधून तिच्या जवळ जाण्याचा प्रयत्न करतो, पण तिनं मला तितकंसं जवळ केलेलं नाही हे खरं! काही वेळा कोशांत न मिळालेल्या शब्दांसाठी पारिभाषिक संज्ञा आपल्या आपण तयार कराव्या लागतात आणि त्या कामात संस्कृतचा आधार घेणं अनिवार्य ठरतं. साहजिकच मग त्या भाषेचं उत्तम ज्ञान असलेल्या ज्येष्ठ व्यक्तींशी संपर्क साधून मी अधूनमधून शंकांचं निरसन करून घेतो.

वयाच्या अठ्ठेचाळिसाव्या वर्षापर्यंत माझा संगणकाशी दुरूनदेखील परिचय नव्हता हे मुद्दाम सांगितलं पाहिजे. व्यावसायिक भाषांतरकर्मी म्हणून वाटचाल करायची असं ठरवल्यावर मी संगणक वापरायचं जुजबी शिक्षण घेतलं आणि हळूहळू केवळ मायक्रोसॉफ्ट वर्ड बऱ्यापैकी आत्मसात केलं. नंतर सात-आठ वर्षांपूर्वी युनिकोड स्क्रिप्ट आणि इन्स्क्रिप्ट कळफलक वापरायला शिकलो अन् त्यावर आता प्रभुत्व प्रस्थापित करता आलं आहे, असं म्हणू शकतो. नोकरीत असताना भाषांतराची थोडीफार कामं मी करीत होतो, परंतु ती हौशीखातर किंवा थोडाफार मोबदला घेऊन. मुक्तजीवी भाषांतरकर्मी म्हणून व्यवसाय करायला सुरुवात केल्यावर अनेकांकडे नित्यानं कामं मिळवण्यासाठी गेलो. माझं

काम किमान स्वीकारार्ह दर्जाचं असलं पाहिजे, कारण पुढे मला कामं मिळविण्यासाठी याचना करीत राहावं लागलं नाही.

माझी अशी धारणा आहे की स्रोत भाषा आणि लक्ष्य भाषा ह्या दोन्हीवर ज्याचं उत्कट प्रेम असतं, तीच व्यक्ती भाषांतराचं काम समाधानकारकरीत्या करू शकते. समाधान हे दोघांचंही - काम करून घेणाऱ्याचं आणि करून देणाऱ्याचंही. प्रेमाची, ममतेची गोष्ट असल्याशिवाय तुम्ही त्यामध्ये आपला जीव ओतू शकत नाही. भाषेवरील आपलं उत्कट प्रेम सातत्यानं वाढत राहण्यासाठीच ती व्यक्ती अपरिचित किंवा नवीन नवीन शब्द, संज्ञा, आपल्या भांडारात साठवत ठेवीत असते अन् त्याचा उपयोग करीत असते.

सहा-सात वर्षांपूर्वी माझ्याकडे कुणीतरी मराठी भाषांतर केलेला एक दस्तऐवज तपासून पाहण्यासाठी व अहवाल सादर करण्यासाठी आला होता. हा दस्तऐवज होता अल्झायमर्स ह्या व्याधीशी संबंधित. तपासून पाहण्यासाठी मूळ इंग्लिशमध्ये असलेला दस्तऐवजही साहजिकच देण्यात आला होता. मराठी मजकूर एकाग्रतेनं वाचत असताना एका विधानानं माझी एकाग्रता भंगली. अल्झायमर्सच्या रुग्णाच्या तोंडी घातलेलं एक विधान होतं, ''मी अंथरुणात प्रसूत झालो.'' मी चक्रावूनच गेलो. वाक्याचा कर्ता पुल्लिंगदर्शी अन क्रिया स्त्रीलिंगदर्शी - तेदेखील वयोवृद्ध पुरुषाच्या तोंडी घातलेलं वाक्य पाहून मला काही बोधच होईना. म्हणून मी मूळ इंग्लिश दस्तऐवज पाहिला. त्यातील विधान होतं, ''आय ॲम कन्फाइंड टु बेड.'' 'कन्फाइंड'चा एक अर्थ प्रसूत होणे असा असला तरी दुसरा, साधासरळ अर्थ 'खिळून असणे' असा शब्दार्थकोशात दिलेला होता. 'शब्दोहि विविधार्थोल्लासक्षम:' म्हणजे एकच शब्द विविध अर्थच्छटा व्यक्त करतो, हे त्यानं समजून घेतलंच नव्हतं, हे उघड होतं. मी तो दस्तऐवज दुरुस्त करून त्याविषयी एक सविस्तर टिपण जोडून काम पूर्ण केलं. ह्या कामाचं 'सार्थ' कौतुक झालं, हे काय सांगायला हवं? ह्या घटनेतूनच प्रस्तुत 'वैद्यक क्षेत्रातील व्यावसायिक भाषांतरकर्मी'चा जन्म झाला आहे! तेव्हापासून अल्झायमर्सवरचे तीन-चार तरी दस्तऐवज मी दुरुस्त करून दिले आहेत, तर काही नव्यानं भाषांतर करून दिले आहेत, शिवाय दमा, मधुमेह, कोलायटिस, इलियेक्टमी, केमोथेरपीमुळं होणाऱ्या वांत्या, रक्ताचा कर्करोग, स्क्रिझोफ्रेनिया, अपस्मार, पार्किन्सनिझम वगैरे अनेक व्याधींवरील दस्तऐवजांची भाषांतरं मी करीत आलो आहे. काही वेळा कुणीतरी केलेली कामं तपासायला वा दुरुस्त करायलाही येतात. अशा प्रसंगी आधी सांगितल्यासारखे असेच अनेक दु:खद विनोदही अनुभवायला मिळतात.

त्यावरून हे सिद्ध होईल की असली भाषांतराची निकृष्ट कामं करून देणारी व्यक्ती आपल्या कामाशी प्रामाणिक नाही, तर केवळ पैशावर नजर ठेवणारी आहे. प्रत्येक

चांगल्या प्रामाणिकपणे केलेल्या प्रयत्नास दाद मिळतेच - सर्वार्थानं - हे अधोरेखित करण्याची गरज नाही. इथं मानधन ह्या शब्दाचा समासविग्रह करताना मान आणि धन असा अर्थ घ्यावा, मान किंवा धन किंवा मान राखण्यापुरतं धन असा करू नये, हे मी स्वानुभवानं सुचवतो.

**मी भाषांतराचं काम कसं करतो?**

माझ्याकडे भाषांतराच्या कामासाठी लागणारी सर्व साधनं आहेत :

- संगणक, त्यात विंडोज एक्स्पी-प्रोफेशनल वसवलेलं आहे. त्यामुळं आपल्याला मराठीच काय, जगातील बहुतेक सर्व भाषांमध्ये लेखन करता येतं - कोणत्याही प्रकारचं वेगळं सॉफ्टवेअर न वापरावं लागता!
- इंटरनेटचं ब्रॉडबँड कनेक्शन आहे.
- सकाळी उठल्यापासून इंटरनेटवरून उपलब्ध असणारी दोन अत्यंत उपयुक्त संकेत-स्थळं चालू करून ठेवलेली असतात. एक असतं आपल्या पत्रव्यवहाराचं अन दुसरं, वनलुक डॉट कॉम हे भाषांतरकर्मीसाठी अत्यंत उपयुक्त ठरणारं शब्दार्थकोशांचं संकेतस्थळ. ह्या एकाच शब्दार्थकोशाच्या संकेतस्थळावरून आपल्याला एकाच वेळी पाच-पन्नास शब्दार्थकोशांकडे एका टिचकीनिशी जाता येतं. अर्थात हे सर्व कोश शब्दांचं वा संकल्पनांचं स्पष्टीकरण इंग्रजी भाषेतच देतात.
- भारतीय भाषांसाठी माझ्या संगणकाशेजारी सुमारे २८-२९ शब्दार्थकोश, विश्वकोश, पर्यायकोश, संकल्पनाकोश, विविध प्रकारचे संदर्भग्रंथ (शरीररचनाशास्त्र, विकृतिशास्त्र, व्याकरण, शुद्धलेखन, भाषालेखन वगैरे) हजर असतात. संकल्पनाकोशांमध्ये ॲलोपाथीखेरीज होमिओपाथी, आयुर्वेदीय टीपाकोश आहेत, वाग्भट, शाङ्‌र्धरसंहिता हे वैशिष्ट्यपूर्ण ग्रंथ आहेत.
- ह्याखेरीज, विविध क्षेत्रांतील भाषांतरकामात आपण वापरलेले शब्द, आपल्या वाचनात, ऐकण्यात आलेले शब्द एका एक्सेल धारिणीत जमा करून ठेवण्याची एक सवय लावून घेतली आहे. ह्या धारिणीत आजपर्यंत सुमारे १० हजार शब्दांच्या नोंदींचा साठा झालेला आहे. नित्याच्या वाचनातली वर्तमानपत्रं, पुस्तकं ह्यांमधूनही मला नवनवीन शब्द मिळतात आणि ते मी आपल्या संग्रहात जमा करून ठेवण्याचा नाद लावून घेतला आहे! आपल्या कामात एखाद्या शब्दासाठी आपण पूर्वी कोणता शब्द योजला होता हे चटकन शोधण्यासाठी ह्या धारिणीचा खूप उपयोग होतो.
- अलीकडे भारतीय भाषांसाठीही संगणकाच्या साहाय्याने भाषांतराची कामं सुलभ करणारी सॉफ्टवेअर्स-कॅट म्हणजेच कम्प्युटर ॲसिस्टेड ट्रान्सलेशन किंवा ट्रान्सलेशन मेमरीची साधनंही उपलब्ध झाली आहेत.

**भाषांतराची प्रक्रिया :** आधी स्रोत भाषेतला दस्तऐवज मी नीट वाचून पाहतो, त्यात अपरिचित किंवा अवघड वाटणाऱ्या शब्दांखाली खूण करून ठेवतो. दस्तऐवजातील प्रत्येक वाक्याचे छोटेछोटे तुकडे करून भाषांतर करायचं, नंतर ते भाषांतराचे तुकडे एकत्र जोडून वाक्य पूर्ण करायचं. अशा प्रकारे सर्व दस्तऐवज पूर्ण करायचा. अशा प्रकारे कच्चं भाषांतर तयार होतं. मग अपरिचित, अवघड शब्दांचे अर्थ कोशांतून, महाजालावरून शोधून काढून योजायचे. भाषांतर मग सुबक, नीटनेटकं केलं जातं.

ह्या दस्तऐवज मग आपल्या घरी काम करणाऱ्या मोलकरणीला वाचायला द्यायचा. तिला त्या भाषांतराचा अर्थ नीट कळला, सोपा वाटला तर ठीक. नाहीतर तिला आपल्या भाषेत काय म्हणतात ते विचारायचं आणि ते शब्द वापरता येतील काय त्याचा विचार करायचा. तिचं मत प्रमाण मानायचं बंधन नसतं; परंतु तिची सामाजिक परिस्थिती, भाषा, वयोगट इत्यादी गोष्टी आपल्या भाषांतराची उपयुक्तता सिद्ध करण्यासाठी उपयोगी पडतात हे लक्षात घेणं गरजेचं असतं. त्यानंतर एखाद्या तज्ज्ञ भाषाप्रभू तसेच तज्ज्ञ डॉक्टरांशी संपर्क साधून भेट घ्यायची, त्यांना तांत्रिक अंगाने ते भाषांतर बरोबर आहे काय, की त्यात काही बदल करावेसे वाटतात का ते विचारायचं. त्या सूचनांचा विचार करून भाषांतर पक्कं करायचं.

ह्या सगळ्या प्रक्रियेत खूप वेळ जातो हे खरं, परंतु अशा प्रकारे पूर्ण केलेलं काम गुणवत्तेच्या दृष्टीनं इतर कोणत्याही सर्वसामान्यतः केलेल्या कामापेक्षा नक्कीच सरस, उत्तम ठरतं. चुकीचा अर्थ लावून केलेल्या भाषांतरामुळे एखाद्या रुग्णाचा जीवदेखील धोक्यात येऊ शकतो आणि त्या अपराधाबद्दल कोण कुणाला शासन करणार? परंतु अतिशय काळजी घेऊन केलेल्या कामाचं कौतुक होणार नाही वा त्याला वाजवी, किंबहुना त्यापेक्षा अधिक मोबदला मिळणार नाही, असं का वाटेल? काही किरकोळ अपवाद वगळता माझे पैसे बुडाल्याचा मला अनुभव नाही. हे अपवाद आहेत ते वैद्यक क्षेत्रातील भाषांतरा-संदर्भातील नाहीत, तर सरकारी दस्तऐवजांची, निर्जीव प्रकृतीची कामं, काही अभियांत्रिकी विषयांतली भाषांतराची कामं केली होती त्यांच्या संदर्भातील आहेत. ■

(१ मे २०११ला मराठी अभ्यास परिषदेतर्फे 'भाषांतर व्यवसायाच्या विविध कक्षा' या विषयावर आयोजित परिसंवादात सादर केलेला निबंध.)

## अभिनंदन

चंद्रपूर येथे होणाऱ्या पंचाऐंशीव्या अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्ष म्हणून ज्येष्ठ कवी व समीक्षक **वसंत आबाजी डहाके** यांची निवड झाली, त्याबद्दल परिषदेतर्फे डहाके यांचे मन:पूर्वक अभिनंदन!

# ललित वाङ्मयाचा अनुवाद

भारती पांडे

मी इंग्रजीमधून मराठी आणि हिंदीमधून मराठी असे ललित वाङ्मयाचे अनुवाद केले आहेत, करते आहे. इतर युरोपीय किंवा आशियाई भाषांचा माझा अभ्यास नाही. ललित वाङ्मयाचा प्रत्यक्ष अनुवाद करताना मला काय अनुभव आले, कोणत्या अडचणी आल्या, मला कोणते प्रश्न पडले आणि हे अनुवाद शक्य तेवढे उत्तम करण्यासाठी मी काय हत्यारं - उपकरणं - आयुधं वापरली एवढ्यापुरताच हा माझा विचार सीमित ठेवणार आहे.

**मी अनुवाद का करते?**

मी एवढं अगदी निश्चितपणे सांगू शकते की अनुवाद करणं हे मला अतिशय आव्हानात्मक वाटतं, हे एक आणि दुसरं म्हणजे माझं भाषा या प्रांतावर कमालीचं प्रेम आहे आणि त्या प्रांतातले खाचखळगे, नव्या वाटा शोधताना मला फार आनंद मिळत असतो. सुमारे तीस वर्षं मी अनुवाद करते आहे आणि या अनुभवावरून मी एक गोष्ट अत्यंत ठामपणे सांगू शकते की, 'मला आता भरपूर वेळ आहे', 'निवृत्त झाल्यावर काय करायचं ते कळत नव्हतं,' 'पैसे बरे मिळतात म्हणे!' या कारणांनी अनुवाद करायला कुणीही सिद्ध होऊ नये. 'मराठी ही तर माझी मातृभाषाच आहे आणि इंग्लिशचं ज्ञानही बऱ्यापैकी आहे की, शिवाय अनुवाद म्हणजे काय एका शब्दाला दुसरा शब्द ठेवला की झालं - थोडं व्याकरण बघितलं, सांभाळलं की पुरे' अशा विचारानं तर कधीच अनुवादासाठी लेखणी उचलू नये.

माफ करा, पण अनुवाद करणं ही इतकी सोपी साधी बाब नाही.

'अनुवाद हा दुय्यम दर्जाचा साहित्यप्रकार आहे.' असं मानणारे बरेच समीक्षक आपल्या ओळखीचे असतील. परंतु अनुवादक ही व्यक्ती सर्जनशील साहित्यिका-एवढ्याच संवेदनक्षमतेची असायला हवी आणि तिची प्रतिभाही तेवढीच संवेदनशील असणं आवश्यक असतं असं मला वाटतं. याचं कारणही उघडच आहे, स्वत:कडे संवेदनशीलता नसेल, तर दुसऱ्याचं म्हणणं समजावून घेणं त्या व्यक्तीला अशक्य ठरतं हे आपल्या रोजच्या जीवनामध्येही आपल्याला पावलोपावली जाणवतं.

ज्या साहित्यकृतीचा अनुवाद करण्याचं धाडस अनुवादक करणार असते ती साहित्यकृती तिला अतिशय भावलेली असते म्हणूनच ती हे काम करायला राजी झालेली

असते - अगदी व्यवसाय म्हणून ती हे काम करत असली तरी - तेव्हा मग त्या साहित्यकृतीमध्ये भेटणाऱ्या सर्व व्यक्ती, त्यांची पार्श्वभूमी, त्यांचे देश, त्या देशांमधील रीतिभाती, थोडक्यात त्या साहित्यकृतीचा संपूर्ण इतिहास, भूगोल, सामाजिक, आर्थिक, राजकीय परिस्थिती आणि मुख्य म्हणजे त्या साहित्यकृतीचा कालखंड यांचं ज्ञान करून घेऊन जर तिनं हे काम केलं तर तो अनुवाद मूळसाहित्यकृतीच्या तोडीस तोड झाल्याशिवाय राहात नाही, हा अनुभव आपल्यासारख्या साक्षेपी वाचकांना आला असेल याबद्दल मला खात्री आहे. माझ्या अनुवादांच्या वेळी हा अभ्यास करण्याचा मी आटोकाट प्रयत्न करते, हे मला इथे नोंदवावंस वाटतं.

अनुवादाविषयी विचार करायला सुरुवात केल्यानंतर आणखी एक गोष्ट मला चांगलीच जाणवली ती सांगते.

ज्या पुस्तकांमुळे निदान मला तरी वाचनाची गोडी लागली, त्यांच्यापैकी बहुतेक पुस्तकं ही अनुवादित होती. अर्थात त्या वयात हे कळण्याचं काहीच कारण नव्हतं; पण मग मात्र 'धाडसी चंदू', 'चंद्रावर स्वारी', 'तीन शिलेदार', 'ॲलिसची नवलकहाणी', 'रॉबिन हूड' अशी कितीतरी. आणि त्यानंतरच्या वाचनात आलेली ॲगाथा ख्रिस्ती, सर आर्थर कॉनन डॉयल... ही सगळी पुस्तकं अनुवादित आहेत हे समजून आलं. आणि तेवढीच महत्त्वाची दुसरी गोष्ट म्हणजे हे सर्व अनुवाद अत्यंत प्रतिभाशाली अशा मराठी लेखकांनी त्यांना स्वतःला अत्यंत आवडलेल्या अशा साहित्यकृतीचे केलेले होते. तेव्हाच खरं तर अनुवादाबद्दलच्या प्रेमाचं बीज पडलं असावं.

बाबूराव अर्नाळकरांनी इंग्रजी रहस्यकथांचे अनुवाद-रूपांतरं करण्याचा लावलेला झपाटा आणि तेवढ्याच झपाट्यानं वाचक त्या अनुवादांचा पाडत असलेला फडशा, हे कदाचित अनुवादाकडे एक व्यवसाय म्हणून बघण्याचं पहिलं पाऊल असावं.

**माझे अनुवादविषयक अनुभव**

१९८०च्या दशकामध्ये मी पर्ल एस० बक या जगप्रसिद्ध लेखिकेच्या 'डेथ अँड डॉन' या कथेचा अनुवाद करून लिहायला सुरुवात केली आणि ती कथा प्रसिद्धही झाली, तेव्हा मला अनेक जुन्या जाणत्या हितचिंतकांनी असा सल्ला दिला होता, 'अनुवादाच्या प्रांतात शिरू नकोस हं - एकदा त्यात अडकलीस की त्यातून बाहेर पडता येणार नाही.' ते असं का सांगत होते ते तेव्हा मला कळलं नाही; पण आता सुमारे तीस वर्षांनंतर मात्र ते मला चांगलंच समजून चुकलंय असं म्हणायला काही हरकत नाही. कारण उघड आहे, एकदा अनुवाद करायला

लागलं की मग त्या आव्हानाचं व्यसनच लागल्यासारखं होतं. निदान माझा तरी असा अनुभव आहे.

आजवर मी काही कादंबऱ्या, काही आत्मचरित्रात्मक लेखन, काही चरित्रात्मक

लेखन, एक कथासंग्रह आणि काही वैचारिक साहित्यकृती असे अनुवाद केले आहेत.

तेहमिना दुर्रानी या मुस्लिम लेखिकेनं लिहिलेल्या 'ब्लास्फेमी' या कादंबरीबद्दल बोलायचं तर हा अनुवाद करताना सतत माझ्या मनात येत होतं की हे जे ही लेखिका लिहिते आहे ते खरं असेल का? 'ब्लास्फेमी'ची कथा मध्य पाकिस्तानातल्या एका मागास खेड्यामध्ये घडते. एक विधवा स्त्री तिच्या सुंदर आणि तरुण मुलीचं - हीरचं - लग्न मुलीच्या वयाच्या तिप्पट वय असलेल्या एका विकृत मनोवृत्तीच्या धर्मोपदेशकाशी लावून देते. त्या खेड्यामध्ये जगत असताना त्या मुलीला जे अत्याचार सोसावे लागतात त्याचं वर्णन वाचतानाही अंगावर काटा येतो. म्हणूनच मनातली ही शंका दूर करण्यासाठी मी मध्य पाकिस्तानातल्या काही खेड्यांसंबंधीची माहिती मिळवली, त्यांच्या चालीरीतींविषयी जाणून घेतलं आणि मग माझ्या लक्षात आलं की इतक्या मागासलेल्या प्रदेशामध्ये हे घडणं सहज शक्य आहे. शिवाय तिथल्या प्रार्थनास्थळांमध्ये घडणाऱ्या अनेक गोष्टी मला आपल्या देशातल्या प्रार्थनास्थळांमध्ये, मठांमध्येही घडताना दिसत होत्याच.

जीन सॅसन या लेखिकेनं मयादा या इराकी स्त्रीची खरीखुरी कहाणी लिहिली आहे. मयादा ही एका श्रीमंत घराण्यातली सुशिक्षित, सुसंस्कृत, जगभर फिरलेली स्त्री आहे. सद्दाम हुसैनच्या कारकिर्दीमध्ये या राजघराण्यातल्या स्त्रीलाही किती जुलुमांना तोंड द्यावं लागलं! याचा अनुवाद करताना मला सद्दाम हुसैनच्या कारकिर्दीचा थोडाफार मागोवा घ्यावाच लागला. त्याशिवाय त्या स्त्रियांच्या मनातली भीती मी नीटपणे मांडू शकले नसते. आणि मयादानं उल्लेख केलेल्या 'केमिकल अली'सारख्या व्यक्तींच्या पाशवीपणाचाही नीट उलगडा झाला नसता. केमिकल अली या माणसानं इराकमध्ये केवळ बंडखोरांवरच नव्हे; तर सर्वसामान्य जनतेवरही 'मस्टर्ड गॅस'चा वापर केला आणि त्यामुळे अक्षरश: हजारो माणसं सोलवटली जाऊन मेली. हा इतिहास आपल्याला माहीतच असेल.

'द स्पाय प्रिन्सेस' हे नूर इनायत खान या हेर स्त्रीचं चरित्र श्राबनी बासू हिनं लिहिलेलं आहे. ही एक सत्यकथाच आहे. दुसऱ्या महायुद्धानंतर पन्नास वर्षांनी ब्रिटिश राज्यकर्त्यांनी जे गोपनीय कागदपत्र खुले केले त्यांचा अभ्यास करून हे चरित्र लिहिलं गेलं आहे. मैसूरचा वाघ टिपू सुलतान याच्या वंशातली ही मुलगी सूफी वडिलांच्या प्रभावाखाली मोठी झाली. सूफी पंथाच्या अहिंसा, सत्यवचन अशा तत्त्वांवर पूर्ण विश्वास असणारी ही मुलगी ब्रिटिशांच्या हेरखात्यामध्ये कशी पोहोचली आणि कधीही खोटं न बोलण्याची शपथ घेतल्यानंतरही तिनं स्वत:वर सोपवलेलं हेरगिरीचं काम कसं पार पाडलं - अगदी प्राणाचं बलिदान देऊनही - हे अतिशय वाचण्यासारखं आहे हे खरं! पण त्यासाठी मला दुसऱ्या महायुद्धामध्ये दोस्त राष्ट्रं, हिटलरचं सैन्य, त्यांच्या आघाड्या, त्यांच्या हेरखात्याची विशिष्ट बांधणी आणि परस्परविरोधी कारवाया यांच्याबरोबरच सूफी

पंथ म्हणजे काय आणि नूरच्या वडिलांनी या पंथाचा प्रसार युरोपात कसा केला; या सर्व बाबींची माहिती करून घ्यावी लागली.

या दोन्ही कादंबऱ्या अनुवादित करताना मला आलेली आणखी एक अडचण म्हणजे त्यांच्यातील व्यक्तींची नावं, स्थळांची नावं ही अनुक्रमे अरेबिक, फ्रेंच व जर्मन भाषांना होती. या भाषांच्या तज्ज्ञांकडे जाऊन मला त्या शब्दांचे मराठी उच्चार नीट लिहून घ्यावे लागले. त्यातील परकीय भाषांमधले वाक्प्रचार आणि संकल्पना समजावून घ्याव्या लागल्या. येथे मध्येच थोडा विषय बदलून मला जाणवलेली आणि चांगलीच खटकणारी आजच्या अनुवादांमधली एक गोष्ट मांडते.

काही अनुवादकांचं असं मत आहे की, हे करण्याची काही गरज नाही. वाचकाला या गोष्टींची काहीही गरज नसते. मला हे पटत नाही. असंच म्हणायचं तर मग एखाद्या शब्दाचा अर्थ कळला नाही तर चालेल असं म्हटल्यासारखं होईल, असं मला वाटतं. मला अनुवादित पुस्तक वाचताना ज्या ज्या गोष्टींमुळे अडकायला होतं, ज्या ज्या गोष्टी खटकतात त्या त्या सर्व मी माझ्या अनुवादात टाळण्याचा निश्चितच प्रयत्न करते.

अनुवाद करणं म्हणजे शब्दाला शब्द ठेवणं नाही, हे एकदा मान्य केलं की मग हे अशा प्रकारचे कष्ट घ्यायची तयारी अनुवादकानं ठेवायलाच हवी, असं मला वाटतं. कारण नाही तर त्या मूळ साहित्यकृतीवर तर अन्याय होईलच; पण त्या साहित्यकृतीचा अनुवाद हाती घेऊन तिची ओळख घेऊ पाहणाऱ्या रसिक वाचकावरही अन्याय होईल.

परभाषेतल्या संकल्पना आणि वाक्प्रचार यांचा विचार करताना मी आपल्यासमोर फक्त दोनतीन उदाहरणं देऊ इच्छिते.

आपल्यापैकी अनेक जणांना माहीत असेल की, वाईन जेवढी जुनी तेवढी चांगली. आणि म्हणूनच इंग्रजी भाषेमध्ये एक असा वाक्प्रचार आहे. 'न्यू वाइन इन ॲन ओल्ड बॉटल'. या वाक्प्रचाराचा अर्थ असा की, बाहेरचं वेष्टण उत्तम प्रतीचं असलं तरी आतली वस्तू मात्र कमी दर्जाची आहे. थोडक्यात हे असं करून मला फसवलं जातंय. पण अनेक अनुवादांमध्ये मात्र नव्या बाटलीत जुनीच दारू भरून दिली गेली असं भाषांतर केलं गेलेलं दिसतं. इथं द्राक्ष संस्कृतीचा अभ्यास असायलाच हवा असं नाही; पण निदान कामचलाऊ माहिती तरी नको? सुप्रसिद्ध विचारवंत लेखक अरुण शौरींच्या नव्या पुस्तकाचं शीर्षक आहे 'वी शुड हॅव नो प्राईस'. याचं भाषांतर जर कुणी 'आम्हाला काही किंमत नाही' असं केलं तर त्याची काय किंमत करता येईल? 'ॲन आय फॉर ॲन आय' या वाक्प्रचाराचं भाषांतर 'डोळ्याला डोळा भिडवून' असं केलं गेलं तर वाचकानं काय बोध घ्यायचा?

अनुवादासाठी हाती घेतलेल्या साहित्यकृतीमध्ये आलेल्या संकल्पनांचा योग्य अर्थ सांगतील अशा आपल्याकडच्या संकल्पना वापरल्या तर काय होईल? उदाहरणार्थ-'टोपीत

आणखी एक पीस' असं म्हणण्याऐवजी 'शिरपेचात मानाचा तुरा' म्हणता येईल का? 'माईल स्टोन'चा अनुवाद 'मैलाचा दगड' असा धेडगुजरी करण्याऐवजी सरळ 'एक महत्त्वाचा टप्पा' असं म्हणायला काय हरकत आहे?

**अनुवादकाची आयुधं**

अनुवाद मग तो ललित साहित्याचा असो की तांत्रिक माहितीचा असो अनुवादकाला सर्वात प्रथम गरज पडते ती शब्दकोशांची. दर तीन ते चार वर्षांनी नवे शब्दकोश उपलब्ध होत असतात, ते सर्व अनुवादकाने घ्यावे असं मी म्हणत नाही पण काही मान्यताप्राप्त शब्दकोश, म्हणी व वाक्प्रचार कोश, सत्त्वशीला सामंतांच्या 'शब्दानंद' या कोशासारखा एखादा अतिशय उपयुक्त कोश हे संग्रही हवेतच.

विद्युल्लेखा अकलुजकरांनी 'आजीच्या सुपातले मोती' या नावाचा एक अतिशय छान असा म्हणींचा संग्रह त्या म्हणी कोणत्या प्रसंगी वापरात येतात त्या प्रसंगांसकट लिहून प्रकाशित केला आहे, त्याचाही मला अनेक ठिकाणच्या संकल्पना अनुवादित करण्यासाठी उपयोग झाला. कृ०पां० कुलकर्णी यांचा 'मराठी व्युत्पत्ती कोश' हा तर माझ्या दृष्टीनं एक उत्तम वाचनच होऊन बसलं आहे.

१९१६ साली पहिली आवृत्ती निघालेला 'द ट्वेंटिएथ सेन्चरी इंग्लिश मराठी डिक्शनरी' हा एन०बी० रानडे यांचा द्विखंडात्मक शब्दकोश आजही मला उपयोगाचा वाटतो. वीरकरांच्या शब्दकोशापासून रमेश धोंगड्यांच्या 'ऑक्सफर्ड इंग्लिश मराठी डिक्शनरी'पर्यंत सगळे कोश ही अनुवादकाची आयुधं आहेत. या सर्वांच्या जोडीला फ्लावेलची डिक्शनरी सेरीज आहे - जिच्यामध्ये इंग्रजी शब्दांची व्युत्पत्ती, काही शतकांमध्ये इंग्रजी भाषेचा झालेला प्रवास आणि विकास, म्हणी, वाक्प्रचार असे खंड आहेत. रीडर्स डायजेस्टनं नुकतीच प्रकाशित केलेली 'रिव्हर्स डिक्शनरी' आहे. थेसॉरस तर अनेक प्रकारचे उपलब्ध आहेत.

हिंदी भाषेतून मराठीमध्ये अनुवाद करतानाही हिंदी-मराठी शब्दकोश असावा लागतो; तसाच उर्दू-हिंदी-मराठी शब्दकोशही असावा लागतो.

आज नव्यानं काम सुरू करणाऱ्या सर्व अनुवादकांजवळ हे सर्व असेलच. त्यांना मी एकच सुचवेन. त्यांनी संगणकाचा वापर करून हे काम केलं तर अनेक प्रकारची हमाली वाचते. म्हणजे शुद्धलेखन, वाक्य किंवा परिच्छेद इकडचा तिकडे हलवणं इत्यादी. इंटरनेटवर मी आधी म्हटलेल्या बहुतेक डिक्शनरीज उपलब्ध आहेत. त्यामुळे उठून शब्दकोश हाती घेऊन शब्द शोधण्याचं कामही करावं लागत नाही. शिवाय आपलं हस्ताक्षर वाचायला न लागल्याने संपादकाची फार मोठी सोय होते ते वेगळंच.

इथे आणखी एक गोष्ट मला आवर्जून सांगायची आहे. आजपर्यंत अनुवादाच्या क्षेत्रामध्ये माझ्या हातून जे काही काम झालं त्याचं सगळं श्रेय मी माझे गुरू डॉ० अशोक

केळकर यांना देते. पर्ल एस० बक या सुप्रसिद्ध लेखिकेच्या 'द गुड अर्थ' या जगप्रसिद्ध कादंबरीचा अनुवाद करायला मी सुरुवात केली तेव्हा मला या क्षेत्राचा तसा काहीच अनुभव नव्हता. मी एवढं मोठं धाडस केलं तरी कसं याचं मला आजही नवल वाटतं. त्या वेळी या अप्रतिम पुस्तकाची अनुवाद झालेली पहिली एकदोन प्रकरणं घेऊन मी डॉ० केळकरांना भेटायला गेले आणि ही वाचून मला जरा काही तरी सांगाल का; असं त्यांना सरळच विचारलं. त्यांच्या नेहमीच्या पद्धतीनं त्यांनीही मला स्पष्टच सांगितलं, 'मला हे सगळं वाचायला वेळ मिळणार नाही, तेव्हा शीतभात न्यायानं मी काही सूचना करू शकेन.' मला तेवढं पुरेसं वाटलं. त्यानंतर थोड्याच दिवसांत सरांचं मला अतिशय तपशीलवार मार्गदर्शन केलं आणि शक्य तेवढे शब्दकोश विकत घेण्याचा सल्लाही दिला. त्यानुसार मी आजवर काम करत आले आहे. सरांचे मार्गदर्शन इतकं मोलाचं आणि स्पष्ट होतं की त्यानंतर मला त्यांच्याकडे या कामासाठी जावं लागलं नाही. त्यांच्या बारीक अक्षरातल्या पिवळ्या कागदावर लिहिलेल्या सर्व सूचना मी अजूनपर्यंत अगदी जपून ठेवल्या आहेत. त्यांचे आभार मानावे तेवढे थोडेच आहेत; कारण त्यांच्यामुळेच मला या माझ्या आवडत्या क्षेत्रामध्ये झोकून देऊन काम करण्याचा आत्मविश्वास मिळाला आहे. ■

(१ मे २०११ला मराठी अभ्यास परिषदेतर्फे 'भाषांतर व्यवसायाच्या विविध कक्षा' या विषयावर आयोजित परिसंवादात सादर केलेला निबंध.)

## सरकारी मिक्स्ड व्हर्जन

गृह मंत्रालयाच्या राजभाषा विभागाने एक आदेश विविध कार्यालयांमध्ये वितरित केला आहे. शुद्ध हिंदी वापराच्या कर्मठ भूमिकेमुळे हिंदीची आवड निर्माण होण्याऐवजी लोक कंटाळतात. त्यामुळे कठीण हिंदी शब्दांच्या वापराचा दुराग्रह नसावा. त्याऐवजी प्रचलित इंग्रजी शब्दांचा देवनागरी लिपीत वापर करावा, असे त्या आदेशात म्हटले आहे. गृह मंत्रालयाच्या 'डिपार्टमेंट ऑफ ऑफिशियल लँग्वेज'ने या आदेशात काही उदाहरणेही दिली आहेत. 'मिसिल'च्या ऐवजी 'फाइल', 'प्रत्याभूती'च्या ऐवजी 'गॅरंटी', 'कुंजीपटल'च्या ऐवजी 'कीबोर्ड' आणि 'संगणक' ऐवजी 'कम्प्युटर' अशा प्रकारे शब्दांचा वापर करता येऊ शकतो, असे त्यात म्हटले आहे. 'लोकप्रिय हिंदी शब्द, तसेच इंग्रजी प्रतिशब्दांचा वापर केल्यास हिंदी भाषा अधिक आकर्षक आणि कार्यालयांमध्ये अधिक लोकप्रिय होऊ शकेल. शुद्ध हिंदी भाषा ही साहित्यिक वापरासाठी असून, कार्यालयीन कामकाजासाठी 'मिक्स्ड व्हर्जन' वापरावी, असेही त्यात म्हटले आहे.

दै० महाराष्ट्र टाइम्स, दि० ०६ डिसेंबर २०११

# भाषा आणि व्यापार

रमेशचंद्र पाटकर

एका देशाच्या दुसऱ्या देशाशी चालणाऱ्या व्यापारातून परस्परांच्या भाषेत शब्दांची देवाणघेवाण होत असते. मराठी भाषेत रूढ झालेल्या इंग्रजी शब्दांचे उदाहरण आपल्या समोर आहे. अरबी, पोर्तुगीज भाषांतील काही शब्दांची उदाहरणे देता येतील. पण व्यापारामुळे एखाद्या भाषेचा प्रसार होतो काय? असा प्रश्न विचारला तर त्याचे होकारार्थी उत्तर देता येईल. इंग्रजी भाषेचा भारतात प्रसार व्हायला ईस्ट इंडिया कंपनीचा भारताशी होणारा व्यापार हे एक कारण आहे. ब्रिटिशांनी भारताला आपली वसाहत बनवून स्वत:ची राज्यसत्ता प्रस्थापित केल्यानंतर इंग्रजी ही राज्यव्यवहाराची भाषा बनवली आणि भारतातील देशी भाषांवर तिच्या वर्चस्वाच्या झालेल्या परिणामांचा इतिहास आपणास ठाऊक आहे.

एखाद्या देशातील भाषेचा इतरत्र प्रसार व्हायला व्यापाराबरोबर, त्या देशाचा जगावर राजकीय व आर्थिकदृष्ट्या किती प्रभाव आहे, हे वास्तवही महत्त्वाचे ठरते.

आज चीन ही जगातील एक आर्थिक (आणि त्याचबरोबर राजकीय) महासत्ता म्हणून उदयाला येत आहे. चीनचे इतर देशांबरोबरच महासत्ता असलेल्या अमेरिकेशी महत्त्वपूर्ण असे व्यापारी संबंध आहेत. अमेरिकेच्या अर्थकारणात चीनची गुंतवणूक फार मोठी आहे. चीनशी व्यापार करणाऱ्या देशातील व्यापाऱ्यांना चिनी भाषा शिकणे बंधनकारक नसले तरी ती शिकणे फायद्याचे ठरते. भारतीय व्यापारांना तसा अनुभव आला आहे आणि येतही आहे.

चीनमध्ये मँदरियन (Mandrian) ही सर्वात महत्त्वाची 'भाषा' मानली गेली आहे. या भाषेत चीनच्या उत्तरेकडील व नैर्ऋत्येकडील प्रदेशात बोलल्या जाणाऱ्या चिनी बोलींचा समावेश होतो.

प्रमाणभूत चिनी भाषा किंवा आधुनिक प्रमाणभूत चिनी भाषा 'मँदरियन' किंवा 'Putonghua' म्हणूनच ओळखली जाते. ही प्रमाण भाषा आज व्यापाराच्या क्षेत्रात वापरली जाते. परदेशी व्यापाऱ्यांना ही प्रमाण भाषा यावी लागते किंवा शिकावी लागते. व्यापारी सौद्यात दुभाषकाचे महत्त्व आजही आहे. पण मँदरियन भाषा आत्मसात केल्याने व्यापारात 'अधिक फायदा' होऊ शकतो, असे तरुण भारतीय व्यापाऱ्यांच्या लक्षात आले असून चीनशी व्यापार करू इच्छिणारे तरुण भारतीय प्रथम ती भाषा शिकू लागले आहेत

आणि मग व्यापाराकडे वळू लागले आहेत.

मँदरियनला जागतिक व्यापार पेठेत आलेले महत्त्व लक्षात घेऊन भारतात ती भाषा शिकवण्याचे वर्ग उघडले गेले आहेत. कोलकत्यात, मुंबईत असे वर्ग उघडले गेले आहेत.

प्रथम भारतीय कॉर्पोरेट कंपन्यांनी चीनशी व्यापारी संबंध जोडण्यासाठी आपल्या कर्मचाऱ्यांना मँदरियन शिकवणीच्या वर्गात पाठवले. त्यानंतर लघु व मध्यम प्रमाणावर व्यापार करणारे ही भाषा शिकण्याकडे वळले, वळत आहेत. स्वस्तात सौदा करता येईल अशा फर्निचर, कापड व इलेक्ट्रॉनिक वस्तूंच्या बाजारपेठेला छोटे भारतीय व्यापारी भेट देतात. हे व्यापारी चीनची प्रमाणभूत भाषा शिकून चीनला गेले आहेत, जात आहेत. २०११च्या पहिल्या तीन महिन्यांत १,२५,००० भारतीयांनी चीनला भेट दिली. त्यातील ७२ टक्के भारतीय व्यापारासाठी गेले होते अशी आकडेवारी 'जनतेच्या प्रजासत्ताक चीन'च्या भारतीय वकिलातीने दिली आहे. ■

(संदर्भ : द इकॉनॉमिक टाइम्स, २१ जुलै २०११)

## दृश्यकलेची भाषा

'दिसणे' ही डोळ्यांना होणारी संवेदना आहे. प्रत्येकाला दिसणारी वस्तू जरी सारखी असली, तर प्रत्येकाच्या भिन्न भिन्न मनोव्यापारामुळे त्या वस्तूच्या दृश्य जाणिवा भिन्न असू शकतात.

पूर्वानुभव, संवेदना, बौद्धिकता, भावनात्मकता आणि 'वस्तू'वर लक्ष केंद्रित करण्याची क्षमता मिळून आपली वस्तुबोधना (Perception) कार्यान्वित करतात. मूळ वस्तूनेच या वस्तुबोधनाची चेतना निर्माण केलेली असते.

वस्तू आणि वस्तुबोधना या दोन गोष्टी एकच आहेत, असे बऱ्याच वेळा गृहीत धरले जाते; म्हणजे व्यक्ती, विशिष्ट वस्तू 'सारखेपणा'नेच पाहाते किंवा त्यांना येणारा अनुभव 'सारखा'च असतो. पण खरे तर असा सर्वांचाच अनुभव नसतो. एकाच व्यक्तीच्या विशिष्ट वस्तूबद्दलच्या बोधना एकाहून जास्त असू शकतील. उदा० झाड तेच. पण सकाळच्या, दुपारच्या, सायंकाळच्या किंवा रात्रीच्या वातावरणात वेगवेगळे भासू शकेल.

अनुभवाच्या आकलनात, दृष्टिकोनात झालेला बदल वस्तुबोधनातही बदल घडवू शकतो. त्यामुळे व्यक्तीला 'नवी दृष्टी' (New Vision) किंवा 'नवी मर्मदृष्टी' (Insight) प्राप्त होऊ शकते.

रमेशचंद्र पाटकर, 'खेळ', जाने०-मार्च २०११, पृ० १९-२०

# वैचारिक कलाकृती

रमेश पानसे

ललित वाङ्मयाप्रमाणेच वैचारिक वाङ्मय ही सुद्धा एक स्वायत्त कलाकृती असते. एखादा वैचारिक लेख हा वाङ्मयीन कलाकृतीप्रमाणेच एकसंध, व परिपूर्ण कलाकृती असते. त्यामुळे तिच्यात नंतर काही अधिक वा उणे करणे हे सयुक्तिक नसते. कारण तसे करण्यातून त्याच्या पोटात असणाऱ्या विचाराला तरी धक्का पोचतो किंवा विचाराचे विस्तारीकरण करणाऱ्या उत्स्फूर्ततेच्या अभिव्यक्तीला तरी धोका संभवतो. त्यामुळेच वैचारिक लेख ही एक स्वतंत्र अशी वाङ्मयकृती आहे, कलेचे आवरण असलेली ती एक कलाकृती आहे. असेच आपण मानले पाहिजे.

वैचारिक स्वरूपाच्या लेखामध्ये एखादा विचार हा त्या लेखाच्या केंद्रस्थानी असतो. लेख म्हणजे त्या केंद्रीभूत विचाराचा विस्तार असतो. वाङ्मयीन कलाकृती ज्याप्रमाणे कल्पनाशक्तीतून साकारत असते, तद्वतच वैचारिक कलाकृती ही विचारशक्तीतून साकारत असते. वाङ्मयीन कलाकृतीमधील कल्पकतेला ज्याप्रमाणे अनुभवांचे पाठबळ मोठ्या प्रमाणावर असते, त्याप्रमाणेच वैचारिक कलाकृतीमधील वैचारिकतेला ज्ञानाचे पाठबळ असते. अर्थातच या ज्ञानातही अनुभवांचा अंश मोठ्या प्रमाणात असतोच; मग तो व्यावहारिक अनुभव असेल अथवा कल्पनेच्या पातळीवरील, विचारांच्या पातळीवरील अमूर्त अनुभव असेल.

वाङ्मयीन कलाकृतीची समीक्षा करताना ज्याप्रमाणे, कलाकृतीतील अभिव्यक्तीची आणि त्यातील जीवनधारणेची शहानिशा सामान्यत: केली जाते, तशाच प्रकारे ती वैचारिक कलाकृतीचीही करता येते; नव्हे, केली पाहिजे. वैचारिक लेखाला जसा विशिष्ट विचाराचा केंद्रबिंदू असतो तसाच तो विचार स्वत:चा सविस्तर आशयही घेऊन येतो. लेखक त्याची आपल्यां परीने, विशिष्ट पद्धतीने मांडणी करीत असतो. त्यामुळे मूळ विचाराभोवतीचा आशयकोष आणि लेखकाची अभिव्यक्तिरीती या दोन्हींचीही नेमकेपणाने समीक्षा करणे शक्य असते. लेखनाने निर्माण केलेला वैचारिक आशयकोष हा जसा त्याच्या (वैचारिक) जीवनधारणेने विणला जात असतो तसाच तो (अपेक्षित) जीवनतारणेनेही विणला जात असतो. माणसाच्या जीवनाला (लेखकाला) काही अपेक्षित असे वळण मिळावे, त्यातून त्रुटी दूर होऊन जीवन अधिक संपन्न व्हावे असे काही

व्यावहारिक हेतू समोर ठेवूनही बऱ्याचदा लेखन होत असते. किंबहुना, नेहमीच, परिवर्तनवादी वैचारिक वाङ्मय हा वैचारिक वाङ्मयाचा एक मोठा नि प्रभावी भाग आहे असे वाङ्मय इतिहासाचे परिशीलन केल्यास लक्षात येईल. यामुळेच कदाचित हेतुपूर्णता हे वैचारिक वाङ्मयाचे एक व्यवच्छेदक लक्षण मानता येईल. ललित वाङ्मयापासून त्याचे वेगळेपण मांडणारे असे हे लक्षण ठरू शकेल.

ललित वाङ्मयाच्या क्षेत्रात, जेवढी नि जितकी प्रगल्भपणे समीक्षा सातत्याने होत गेली आहे, तेवढी ती वैचारिक वाङ्मयाच्या क्षेत्रात झालेली नाही. ललित वाङ्मयाच्या समीक्षेचे शास्त्रही तयार झाले आहे, तसे ते वैचारिक वाङ्मयाच्या बाबतीत अजूनही तयार झालेले नाही. तसे ते होणे गरजेचे आहे कारण, वैचारिक लेखनाचा व्याप खूप मोठा आहे. एवढेच नव्हे तर तो विविधांगी, विविध ज्ञानक्षेत्रांशी निगडित असा आहे. विशिष्ट वैचारिक कलाकृती ही ज्या विशिष्ट अशा एका (किंवा त्याहून जास्त) ज्ञानक्षेत्रांशी संबंधित असेल तेवढी ती कलाकृती अधिक व्यामिश्र होते. समीक्षकाला याचे आव्हान पेलणे खूप कठीण असते. म्हणूनही कदाचित या दिशेला फारसे कोणी फिरकत नसावे.

ललित वाङ्मयाच्या समीक्षेचा एक पाय जीवनानुभवात असतो आणि दुसरा पाय त्याच्या (सौंदर्य) शास्त्रीय गुणपरीक्षेत असतो तसाच वैचारिक वाङ्मय समीक्षेचाही प्रकार असू शकतो. जीवनधारणेशी असलेला त्याचा संबंध तर स्पष्टच आहे. पण, त्याला सौंदर्याचे अधिष्ठान नसते असे मानण्याचे कारण नाही. एखादा वैचारिक लेख, मेंदूलाच केवळ नव्हे; तर मनालाही भुरळ घालू शकतो; आणि हे ललित कलाकृतीप्रमाणेच वैचारिक कलाकृतीचेही बलस्थान मानायला हरकत नाही. इंग्रजीतील अशी बरीच उदाहरणे इंग्रजी वाचकांना आढळतील; पण, मराठीतही त्याची वानवा नाही. (उदाहरणादाखल स०ह० देशपांडे यांचा 'शारद्वत' हा लेख अथवा संपूर्ण पुस्तकच पाहावे. किंवा श्री०म० माटे यांची 'विज्ञानबोधाची प्रस्तावना' पाहावी. येथे श्री०म० माटे हे स०ह० देशपांडे यांचे गुरू होते हा केवळ योगायोग मानावा! विनोबांचे 'गांधी : जसे पाहिले, जसे जाणले' हे पुस्तक पाहावे!) अर्थात अशी उदाहरणे शोधणे, आणि त्यांची वैचारिक-वाङ्मयीन समीक्षा करणे, असे काम होण्याची गरज आहे. पुढे त्यातून वैचारिक लेखनाचेही समीक्षाशास्त्र उभे राहणे शक्य आहे. तरीही मग, अशा शास्त्राची स्थानिकता नि सार्वत्रिकता पडताळून पाहण्याच्या कामाचे ताटही पुढे वाढून ठेवलेलेच आहे.

आजच्या ललित वाङ्मयीन समीक्षेच्या पद्धती वैचारिक वाङ्मयाला लावता येतील का? अथवा वैचारिक वाङ्मय समीक्षा असे स्वतंत्र क्षेत्र यापूर्वीच तयार झाले आहे का? आणि तसे ते असेल तर त्या आधारे मराठीतील वैचारिक लेखनाची समीक्षा होत गेली आहे काय? असे काही अत्यंत प्राथमिक आणि जुजबी प्रश्न आज माझ्या मनात आहेत. ■

# लोकसाहित्याने संपन्न लोकजीवन

**कोकिळा ह० चांगण**

सातारा जिल्ह्यातील माण तालुका हा डोंगर परिसरात वसलेला आहे. हा पठारी प्रदेश आहे आणि उत्तरेला शिंगणापूरच्या महादेवाची डोंगर रांग कारखेलपर्यंत पसरली आहे. माण नदी कुळकजाईजवळ सीतामाईच्या डोंगरात उगम पावली आहे. माण तालुक्यात अनेक लोकदैवते आहेत. शिंगणापूरचा शंभू महादेव, कुळकजाईची सीतामाई, पांगरीचा विरोबा, गोंदवल्याचे ब्रह्मचैतन्य महाराज, म्हसवडचा सिद्धनाथ ही त्यापैकीच काही महत्त्वाची दैवते आहेत. ही लोकदैवते लोकसाहित्यातही प्रकटली आहेत. त्यातील काहींचा विचार येथे केला आहे. माण तालुक्यातील शिखर शिंगणापूरचा महादेव हे दैवत महाराष्ट्रभर प्रसिद्ध आहे.

कैलास पर्वतावर पार्वतीशी सारीपाट खेळताना शंकर हारले; म्हणून ते दक्षिण भारतात रुसून आले. त्यांना जो परिसर आवडला, त्या परिसरात ते थांबले. याचा उल्लेख स्त्री-गीतात आहे.

नौखंड पिरथिवी धुंडूनी । आलं महादेव चालूनी ।
जागा तिर्थाची पाहुनी । खाली ठिविलं भूषाण ।
वर लाविलं निशाण । पाच नंदी हायतं म्होरं ।
नंदी कारण हुकुम केला । तुम्ही येवं जावं चरूणी ॥
पाच घाट उतरूनी गेलं । माळ्याच्या मळ्याला ॥
साळीदाळी तुडवुनी केली । मळ्याची घाण ।
माळी बसलाय राखाण । कुदळ मारली चांडाळाणं ।
टोच्या खुर्प्याच्या मारीयला । पळ नंदीनं काढीयला ।
निरवांगीचा बाजार । ती गं भरतोय भवंजणं ।
तेली तांबोळी बुरड-बागवाण । तिघं हायती एका सदरनं ।
अन् डावा कान दिला नंदिनी ।

नौखंड पृथ्वी फिरून महादेव या तीर्थाच्या ठिकाणी आले. स्वतः देव आहोत हे भूषण खाली ठेवले व डोंगरावर निशाण लावले. या परिसरातला हा सर्वात उंच डोंगर असून महादेवाच्या मंदिराचे शिखर इतके उंच आहे की या शिखरावर बसून जेव्हा कावळा पाणी पिईल तेव्हा हे जग नष्ट होईल अशी एक श्रद्धा आहे. म्हणजे या शिखरापर्यंत

पाणी आल्यावर सर्व पृथ्वी जलमय होईल. शंकराचे वाहन नंदी. हे पाच नंदी देवासमोर आहेत. शंकराने या नंदींना चरायला जाण्यास आज्ञा केली. पाच घाट उतरून निरवांगी या गावातील माळ्याच्या शेतात गेले. शेताची नासधूस केली. माळ्याने हे बघितले. नंदीला कुदळीने व खुरप्याने मारले. नंदीने तिथून पळ काढला.

भक्तांवर एखादे संकट आले तर त्याची चाहूल परमेश्वराला लागते. मग भक्ताच्या हाकेला त्याला धाऊन जावेच लागते, असे एक लोकतत्त्व.

''तेल्याभुत्याची कावड
मुंगी घाटाला तटली ।
संभू देवाची गिरिजा नार
कुंकू लेताना उठली ।''

महादेवाला भक्त कावडीने पाणी घालतात. तेल्याभुत्याची कावड अतिशय अवघड अशा मुंगी घाटाने वर चढून देवापर्यंत येते. हा घाट अतिशय अवघड-उभा-आहे. पण हे महादेवाचे भक्त पाण्याने भरलेली कावड आपल्या परमेश्वराचा धावा 'संभ्या धाव म्हाद्या धाव' करीत वर चढवतात. त्या भक्तांना होणारा त्रास पार्वतीला म्हणजेच गिरिजेला कुंकू लावताना जाणवतो व ती उठून उभी राहते. अशी ही पार्वती भोळ्या शंकरापेक्षा हुशार आहे, असा उल्लेख लोकगीतात आहे.

''शंकरापरास पारबत्तीया किती श्यानी ।
नऊ लाख पिरथिवीचा पाया रचियला दोघायानी ।।
चैत्राच्या महिन्यात यात्रा करिती पाणीपाणी ।
संबू का देव बोलंऽऽ गिरजा रांजण भर दोन्ही ।।''

शंकर हा भोळा आहे; पण पारबत्ती ही श्यानी म्हणजेच शंकरापेक्षा हुशार आहे. या दोघांनी मिळून पृथ्वीचा पाया रचला. चैत्र महिन्यात शिंगणापूरची यात्रा भरते - तेव्हा उन्हामुळे भाविकांना खूप तहान लागते. ही तहान भागवण्यासाठी शंकर पार्वतीला रांजण भरण्यास सांगतात. असा आशय या ओव्या स्पष्ट करतात.

सीता वनवासात असताना या तालुक्यातील कुळकजाईजवळील सीतामाईचा डोंगर म्हणून जो ओळखला जातो, त्या डोंगरावर तिला लक्ष्मणाने सोडले. ती झोपली असताना लक्ष्मणाने पाण्याने भरलेले दोन द्रोण तिच्या उश्याला व पायथ्याला ठेवले. झोपेतून उठताना तिने आळस दिल्यानंतर दोन्ही द्रोण सांडले. सीतामाईच्या डोंगरावर त्याचे दोन कुंड आहेत व या कुंडातूनच दोन नद्या उगम पावतात. उश्याच्या बाजूला जो कुंड होता दक्षिण दिशेचा त्यातून माणगंगा उगम पावते व ती शिंदी भांडवलीवरून म्हसवडवरून पंढरपूरला जाऊन चंद्रभागेला मिळते. तर पायाच्या बाजूला जो कुंड होता उत्तर दिशेचा त्यातून बाणगंगा उगम पावते. बाणगंगा उपळवे गावातून फलटणवरून सोमंथळीवरून

सांगवीजवळ नीरा नदीला मिळते. अशी लोककथा सांगितली जाते की सीता वनवासात असताना तिला कोणीही पाणी दिले नाही म्हणून तिने या प्रदेशात दुष्काळ राहील, असा शाप दिला.

सीतामाई वनवासात जे जीवन जगली ते स्त्री-गीतातून प्रकट झाले आहे.

सिताई सांगी कथा
त्यापल्या जन्माची परवड
लहुअंकुश बाळा येळं
नव्हता न्हाणीला तरवड
भयीन वनामधी
कोण रडत ऐका
सिताला समजावया
बोरी बाभळी बायका
भयीन वनामधी
काय दिसतं लालीलाल
सिता नार बाळंतिण
तिनं लुगड्याचं दिलं पाल
भयीन वनामधी
माडी कुणाची उघडी
सीता नार बाळंतीण
तिची वाळती लुगडी
भयीन वनामधी
दिवा कुणाचा जळतो
सिता नार बाळांतीण
लहु अंकुश खेळतो
सिता नारं बाळंतीण
तिनं गवताची केली सेज
लहू अंकुश बाळा नीज ॥
ऐन वनामधी काय वाजतं मंजुयिळ ।
काय वाजतं मंजुयिळ ॥
लवअंकुश बाळायेळं सिता घालिती आंघुयिळ ।
सिता घालिती आंघुयिळ ॥
ऐन वनामधी काय वाजतं सरईस । काय वाजतं सरईस ।

लवअंकुश बाळायाचं सिता घालिती बारयिस ॥
सिता घालिती बारयिस ।
ऐन वनामधी तिथं कुठबियिली न्हाणी ।
कुठबियिली न्हाणी ।
देव तातुबा घाली पाणी दोन्ही नेतर झाकुयानि ।
दोन्ही नेतर झाकुयानि ।
लव का लव्हाळ्याचा हाय अंकुश रामायाचा ।
हाय अंकुश रामायाचा ।

सीता वनवासात असताना वाल्मिकी ऋषी (ज्यांना सीता तात म्हणत असे) यांच्याकडे राहत होती. या प्रदेशात त्यांना तातमगिरी असे म्हणतात. हे तातमगिरी जिथे देवाच्या पूजेची फुले आणण्यास जात त्या गावाला आज ताथवडा हे नाव आहे. ते फलटण तालुक्यात आहे. तसेच हे तातमगिरी ज्या डोंगरावर राहत तो डोंगर फलटण तालुक्यातील दुधेबावी गावाच्या पूर्वेला नाईकबोंबवाडी या गावाजवळ आहे. आजही तिथे सीतेची आंघोळीची न्हाणी आहे.

लोककथांमध्ये असे सांगितले जाते की तातमगिरी हे अंध होते. सीतामाई पाण्याला जाताना तातमगिरींना सांगून जाते की अंकुश पाळण्यात खेळत आहे त्याला झोका द्या. थोडे लांब गेल्यावर अपत्य काळजीने ती परत येते. तात तर अंध आहेत. एखादा हिंस्र प्राणी येऊन बाळाला घेऊन जाईल. म्हणून ती गुपचूप अंकुश बाळाला बरोबर घेऊन जाते. तातमगिरी झोका देतात तेव्हा त्यांना तो पाळणा हलका लागतो. हाताने चाचपून बघितल्यावर त्यांच्या लक्षात येते अंकुश बाळ पाळण्यात नाही. त्यांना वाटते वाघ-सिंह कोणत्या तरी हिंस्र प्राण्याने बाळाला नेले. आता सीतामाई आल्यावर तिला काय उत्तर द्यायचे? म्हणून तातमगिरी रानातील लव्हाळा ही वनस्पती उपटून स्वच्छ धुवून बाळुत्यात गुंडाळून पाळण्यात झोपवतात व त्याला झोका देतात. सीतामाई परत येईपर्यंत त्या लव्हाळ्याचा बाळ तयार होतो. तोच लव्ह. असामान्य व्यक्तीचा जन्म वेगळा असतो हे जे लोकतत्त्व ते येथे दिसते. सीतेचा जन्मही असाच झाला आहे.

सितानाबाई बोल आम्हा कुठला मातापिता
जनक राजाच्या घरी जन्म पेटीनामधी होता ।

अशा या सीतामाईच्या डोंगरावर संक्रांतीच्या सणाला खूप साऱ्या स्त्रिया येतात. या दिवशी सीतामाईच्या डोंगरावर खूप मोठा उत्सवच असतो. या लोकसाहित्याने असे लोकजीवन संपन्न केले आहे. म्हणूनच भाषेच्या मौखिक परंपरा जतन करणाऱ्या लोकसाहित्याचा संदर्भ आजही लक्षात घ्यावा लागतो.

■

# राजकारण्यांची भाषा

[ चिकित्सक संदेशप्रबंध विश्लेषण पद्धतीनुसार सोदाहरण विवेचन ]

कल्पना कुलकर्णी

विसाव्या शतकाच्या दुसऱ्या अर्धकात भाषाविज्ञानाच्या क्षेत्रात अनेक बदल घडत गेले. वर्ग-वर्ण-लिंग यावर आधारित सामाजिक वर्गीकरणाचे एक महत्त्वाचे साधन म्हणून भाषेकडे पाहिले जाऊ लागले. भाषा म्हणजे केवळ संज्ञापनाचे - विशिष्ट भाषिक समाजातील विचारांच्या आदानप्रदानाचे साधन नाही, तर ती संपूर्ण समाजमनाचा आरसाच आहे. भाषावापराच्या विविध पद्धती या नैसर्गिक नसून समाजातील किंवा विवाह, कुटुंब, वर्ण, न्याय किंवा प्रसारमाध्यमे आदी सामाजिक संस्थांतील वर्चस्वधारकांनी हेतुपुरस्सर लादलेल्या 'संरचना' आहेत. त्या कृत्रिम आहेत. त्यांचे खरे स्वरूप ओळखून त्यांना आव्हान देता येते आणि ते समानतेच्या दिशेने बदलता येते, हे निर्विवाद सत्य आहे.

भाषेच्या अशा सामाजिक कार्याचे भान ठेवून भाषावैज्ञानिकांनी समाजातील प्रचलित संदेश प्रबंधांचे विश्लेषण करायला सुरुवात केली. सामाजिक संदर्भात भाषेचा विचार करणाऱ्या स्वनिम, पद किंवा वाक्य या भाषाअंगांच्या पलीकडे जाऊन भाषाव्यवहारांचा विचार करणाऱ्या अनेक भाषावैज्ञानिक प्रणाली उदयाला आल्या. भाषाव्यवहार ही एक 'भाषिक कृती' (स्पीच ॲक्ट) आहे, व्यक्तींमधील संवाद (इंटर ॲक्शन) आहे. भाषित (अटरन्स) किंवा सामाजिक कृती (सोशल ॲक्ट) आहे असे प्रतिपादन करणाऱ्या अनेक विचारसरणी अस्तित्वात आल्या. कार्यलक्ष्यी (फंक्शनल), प्रत्यक्षप्रयोगलक्ष्यी (प्रगमॅटिक) आणि संदेशप्रबंध (डिसकोर्स) या त्यातील प्रमुख भाषा विचारप्रणाली आहेत. विसाव्या शतकाच्या उत्तरार्धात उत्क्रांत होत गेलेल्या या विचारसरणींचा उत्कर्षबिंदू म्हणून आपण 'चिकित्सक संदेशप्रबंध विश्लेषण' (चि०सं०वि०) (क्रिटिकल डिसकोर्स अनालिसीस - सीडीए) या भाषा-अभ्यासपद्धतीचा निर्देश करू शकतो. समाजातील संप्रेषण कृतींमध्ये संदेशनिर्मिती आणि संदेश-आकलन यांच्या दरम्यान घडणाऱ्या सर्व घटकांचा शोध घेत घेत संदेशाचा उगमच मुळी जिच्यातून होतो त्या मानसिकतेला जाऊन भिडणे, हा चि०सं०वि०चा प्रधान हेतू आहे. भाषा ही चिन्ह-व्यवस्था व या चिन्ह-व्यवस्थेने संकेत केलेली समाजव्यवस्था यातील आंतरसंबंध प्रस्थापित करणे, हा चि०सं०वि०चा प्रमुख अभ्यास-विषय आहे.

चि०सं०वि०चा गाभा 'संदेशप्रबंध' व 'चिकित्सक विश्लेषण' या दोन कल्पनांशी



अनुक्रमणिका

निगडित आहे. त्या समजावून घेणे आवश्यक आहे. संदेशप्रबंध ही पारिभाषिक संज्ञा सर्वसामान्य भाषेत 'भाषेचा समाजातील प्रत्यक्ष वापर' अशी अनुवादित करता येईल. समाज हा वस्तुतः विवाह, कुटुंब, शाळा, विद्यापीठे, न्याय, शासन अशा अनेक संस्थांनी बनलेले एक जाळेच आहे. यातील प्रत्येक संस्थेची रचना व तिच्यातील सभासदांचे परस्पर-संबंध हे कृत्रिमपणे संरचित असतात. त्यांचे संरचित स्वरूप अधिकच बळकट केले जाते ते त्या त्या सामाजिक संस्थेशी निगडित अशा वैशिष्ट्यपूर्ण, साचेबंद भाषाव्यवहारांनी. सामाजिक संस्थांशी निगडित अशा संदेशप्रबंधांचे अगणित प्रकार पाहायला मिळतात- जसे की औपचारिक-अनौपचारिक संभाषणे, वर्गातील शिक्षक-विद्यार्थी संवाद, जाहिराती, दूरदर्शनवरील मुलाखती इत्यादींच्या संदेशप्रबंधांचे संपूर्ण आकलन होण्यासाठी केवळ ध्वनी, शब्द, वाक्य या स्तरांवरील विश्लेषण पुरेसे ठरत नाही. त्यासाठी संदेशप्रबंधाचे सामाजिक संदर्भही विचारात घ्यावे लागतात. प्रत्यक्ष भाषा वापराच्या संदर्भांचे हॅलिडे व हसन (१९७६) या कार्यलक्ष्यी भाषावैज्ञानिकांनी तीन शीर्षकांखाली वर्गीकरण केलेले आहे : (१) संदेशप्रबंधात गुंतलेल्या व्यक्ती (टेनर) (२) संदेशप्रबंधाचा विषय (फिल्ड) व (३) माध्यम (मोड). ते लिखित, मौखिक किंवा दृक्श्राव्यही असू शकते. संदेशाच्या पूर्ण आकलनासाठी त्याच्या निर्मितीचे स्थळ-काळ, त्याचा वक्ता व श्रोता हे निकटचे, तसेच सामाजिक, सांस्कृतिक असे व्यापक संदर्भही विचारात घ्यावे लागतात.

चि०सं० विश्लेषक संदेशप्रबंधाकडे चिकित्सकपणे पाहतो तेव्हा संदेशाचे त्याने केलेले विश्लेषण संदेशात अनुस्यूत असलेला एखादा गर्भितार्थ उघड करण्याच्या उद्देशाने प्रेरित झालेले असते. 'चिकित्सा' या शब्दाचा संबंध विश्लेषणाच्या या मूलभूत उद्देशाशी आहे. फेअरक्लो (१९९५:२७) या भाषावैज्ञानिकाने दाखवून दिल्याप्रमाणे समाजाचे घटक असलेल्या बहुतेक सर्व संस्थांतील सभासदांचे नातेसंबंध हे समतेपेक्षा असमतेवर, सत्तेच्या किंवा अधिकारांच्या असमतोल विभागणीवर आधारित असतात. आंतरसंबंधांच्या या संरचना अधिक बळकट करण्याकडे सत्ताधाऱ्यांचा कल असतो. हे उद्दिष्ट साध्य करण्याचा प्रभावी मार्ग म्हणजे त्या कनिष्ठ-वरिष्ठ नातेसंबंधाचे साचीकरण करणे व मग त्या साच्याचे प्रमाणीकरण करणे. नात्याचे साचेबंदीकरण साध्य करण्याचा उत्तम उपाय म्हणजे सभासदांतील भाषाव्यवहार पद्धतींचे म्हणजेच संदेशप्रबंधाचे ढाचे बनवणे व मग त्या भाषिक ढाच्यांचे प्रमाणीकरण करणे. शासकीय कचेऱ्यांमधून किंवा शैक्षणिक संस्थांमधून चालणारे भाषाव्यवहार, या संस्थांतून प्रसिद्ध होणाऱ्या पत्रकांची किंवा आदेशांची भाषा पारखून पाहिल्यास याची प्रतीती येते. बऱ्याच वेळा संस्था नवीन तंत्रज्ञानासारखे नवीन संदेशप्रबंध तयार करतात. उच्च शिक्षणसंस्थांच्या मूल्यांकनासाठी व प्रमाणीकरणासाठी अस्तित्वात आलेल्या 'नॅक' या संस्थेच्या इंग्रजी मार्गदर्शक पुस्तिकेतील हे काही संदेशप्रबंध




अनुक्रमणिका

पाहा : 'बेस्ट प्रॅक्टिसेस बेंचमार्किंग', 'इन्स्टिट्यूशनलायजेशन ऑफ बेस्ट प्रॅक्टिसेस', 'युनिटायझेशन ऑफ सिलबस'! महाविद्यालयांवरील पकड घट्ट करू पाहणारे हे संदेशप्रबंधांचे चाप शहरांपासून लांब आदिवासींसाठी वगैरे चालवल्या जाणाऱ्या महाविद्यालयाची सांस्कृतिक किंवा जमातिक ओळख पार घुसमटवूनच टाकायचे! चि०सं० विश्लेषक या सर्व भाषाव्यवहारांकडे डोळसपणे पाहते. भाषावापराच्या भाषागत व भाषेतर अशा सर्व सयुक्तिक संदर्भांचे अवलोकन व विश्लेषण करून त्यात गर्भित असलेल्या मूल्यव्यवस्थेचा शोध घेते. चि०सं० विश्लेषणाचा हा उद्देश संदेशप्रबंधाचे विरचनीकरण (डिकन्स्ट्रक्शन), निर्गुढीकरण (डिमायस्टिफिकेशन), निर्नैसर्गीकरण (डिनॅचरलायझेशन) किंवा निर्मुखवटीकरण (अनमास्किंग) अशा वेगवेगळ्या शब्दप्रयोगांनी व्यक्त केला जातो. हा उद्देश साध्य करण्याच्या प्रयत्नात चि०सं०वि० केवळ भाषाविज्ञानापुरते मर्यादित राहात नाही. संज्ञापन आणि समाजरचना, सामाजिक संबंध आणि सामाजिक संघर्ष, आधुनिकोत्तर काळ आणि बदलत्या मूल्यव्यवस्था यांच्याशी संबंधित सर्व ज्ञानशाखांशी ते जवळीक साधते व आपल्या संकल्पना आणि संशोधन पद्धती समृद्ध करते. या दृष्टीने चि०सं०वि० हा एक आंतरविद्याशाखीय अभ्यास आहे.

आधुनिकोत्तर काळात भाषेकडे डोळसपणे पाहण्याची गरज प्रकर्षाने जाणवू लागली आहे. आज केवळ भौतिक मूर्त उत्पादनेच नव्हेत तर कल्पना, श्रद्धा, प्रवृत्ती यांनाही बाजाराच्या कक्षेत आणण्याच्या प्रयत्नांना ऊत आलेला आहे. ही मूर्त-अमूर्त उत्पादने विकण्यासाठी मग ग्राहकांवर प्रभाव पाडणं आले. त्यांचा अनुनय करू शकेल अशा भाषेतून त्यांच्यापर्यंत पोहोचणे आले. परिणामतः ग्राहकांना लुभावेल अशा भाषेचे अनेक नवनवे अवतार अस्तित्वात आले. किंबहुना भाषा हीच एक विकाऊ वस्तू बनली, लक्ष्य ग्राहक-वर्गाला रुचेल अशा वेष्टनात लपेटून पेश केलेली! वर्तमानपत्रे, रेडिओ आणि टी०व्ही०वरून धो धो कोसळणाऱ्या जाहिराती भाषेच्या या बाजारीकरणाची साक्ष देतील. एकोणीसशे साठ-सत्तरच्या दशकातील सिने-संगीताच्या चाहत्यांसाठीची विविधभारती 'देशके दिलकी सुरेली धडकन्' बनते, तर मराठी-हिंदी-इंग्रजी अशी धेडगुजरी बोली बोलणाऱ्या 'जनरेशन नेक्स्ट'साठीची 'रेडिओ मिर्ची', 'इट्स हॉट' अशी ग्वाही देते. माहिती तंत्रज्ञानावर पोसलेल्या आजच्या पिढीसाठी 'कोड स्विचिंग' ही एक सहज गोष्ट आहे. मग दूरदर्शनवरील कमर्शियल ब्रेक्समधल्या जाहिरातीतील नोकरीवरून थकून आलेली स्कर्टधारी माता तिच्या मुलांनी बनवलेलं इन्स्टंट सूप पिता पिता म्हणते, ''आय विश की मेरा बॉस भी इतना स्वीट होता!'' ग्राहकाला किंवा उपभोक्त्याला केंद्रस्थानी मानून त्याचा अनुनय करू पाहणारी ही आधुनिकोत्तर काळातली संस्कृती 'उपभोक्तावाद' म्हणून ओळखली जाते. वास्तविक पाहता फेअरक्लोने (१९९५) दाखवून दिल्याप्रमाणे उपभोक्तावाद हे भांडवलशाहीचेच एक परिपक्व रूप आहे.

व्यापारीकरणाच्या आणि जाहिरातबाजीच्या या विळख्यातून आजचे राजकारणही सुटलेले नाही. राजकारणात आज प्रचंड फलक, अफाट भाष्ये आणि पोकळ आश्वासनांच्या जाहिरातबाजीचाच आश्रय घेतला जाऊ लागला आहे. अलीकडच्या लोकशाहीत लोकांपर्यंत पोचवण्याचा एक सोपा संदेशप्रबंध राजकारण्यांना उपलब्ध झाला - त्याला आपण 'राजकीय जाहिरात' असे म्हणू. चि०सं० विश्लेषण हे अशा जाहिरात संदेशप्रबंधाचा बुरखा दूर करू शकते. त्यासाठी उदाहरण म्हणून चार वर्षांपूर्वी प्रसिद्ध झालेल्या एका राजकीय जाहिरातीचा विचार करता येईल. २६ जानेवारी २००७च्या 'सकाळ' या वृत्तपत्रात महापालिकांच्या निवडणुकीसाठी आपल्या प्रचार मोहिमेचा एक भाग म्हणून नव्यानेच जन्मलेल्या महाराष्ट्र नवनिर्माण सेना (मनसे) या पक्षाच्या संस्थापक-नेत्याची ती जाहिरात आहे. (नमुना म्हणून ही जाहिरात घेतली आहे. इतर राजकीय पक्षांच्या जाहिरातींचेही असे विश्लेषण करता येईल.) मांडणी, रचना, संहिता, भाषाशैली, दृश्य आणि संदर्भ या जाहिरातीच्या विविध अंगांचे चि०सं० विश्लेषकाच्या दृष्टिकोनातून परीक्षण करता येईल.

**मांडणी आणि संहिता**

जाहिरात या संज्ञापनप्रकारात वापरल्या जाणाऱ्या पारंपरिक मांडणी-पद्धतीचा अवलंब या जाहिरातीत केला आहे. एकमेकांना विरोधाने (काळ्या-पांढऱ्या) उठाव देणाऱ्या दोन चौकटी. वरच्या पांढऱ्या चौकटीत 'मनसे'चे नेते राज ठाकरे यांची काळी-पांढरी छबी. सोबत 'होय' हे माझे बंड आहे... हे थीम-वजा शीर्षक. त्या खालील काळ्या चौकटीत पांढऱ्या अक्षरात कवितासदृश 'रूप' असणारी सहा ओळींची संहिता. त्या खाली उजव्या कोपऱ्यात निवडणूक-चिन्ह व त्याचे शब्दगत भाषांतर. त्याच्या बाजूला मतदारांना केलेले मनसेला निवडून देण्याचे आवाहन.

शब्द आणि दृश्य या दोन्हींचा मिलाफ संहितेत दिसून येतो. त्यातील छबीची दोन ठळक वैशिष्ट्ये जाणवतात. त्यांच्या उजव्या हाताची 'विचारमग्न' ठेवण व चष्म्याआडच्या डोळ्यातले गंभीर भाव. ही दोन वैशिष्ट्ये एखाद्या बुद्धिवान, गंभीर अशा विचारवंताची प्रतिमा तयार करतात. लिखित संहितेचा सारा आशय 'बंड' या शब्दात एकवटलेला आहे. लिखित संहितेचा गाभा असा आहे :

*'होय', हे माझे बंड आहे... सत्ताधारी वर्गाच्या कामचुकारपणाविरुद्ध.*

*'होय', हे माझे बंड आहे... शहरांच्या खुंटवलेल्या विकासाविरुद्ध.*

*'होय', हे माझे बंड आहे... अस्वच्छता, अनारोग्य आणि बकालपणाविरुद्ध.*

*'होय', हे माझे बंड आहे... गतिमान, आधुनिक, विकसित महाराष्ट्र घडविण्यासाठी.*

*'होय', हे माझे बंड आहे... नवनिर्माणाचं शिवधनुष्य पेलू इच्छिणाऱ्या जिगरबाज तरुणतरुणींसाठी.*

*'होय', हे माझे बंड आहे... महाराष्ट्राच्या नवनिर्माणासाठी आशा लावून बसलेल्या सर्वांसाठी.*

सदर बंड हे वर्तमान महाराष्ट्रातील काही नकारात्मक गोष्टींच्या 'विरुद्ध' तर भावी महाराष्ट्रातील सकारात्मक बदलां'साठी' आहे. छबी व संहिता यातून दिलेला संदेश स्पष्ट आहे. हे बंड विचारपूर्वक केलेले आहे. बंडकर्त्यांना किंवा बंडाच्या मालकांना ('माझं') त्याचा अभिमान आहे. महाराष्ट्राचं 'नवनिर्माण' हे 'शिवधनुष्य' (पौराणिक रूपक) पेलण्याइतके अवघड आहे. हे शिवधनुष्य पेलू इच्छिणाऱ्या जिगरबाज तरुण-तरुणींची एकच आशा म्हणजे फोटोतल्या 'मी'चा मनसे पक्ष. महाराष्ट्राच्या दोन प्रतिमांभोवती - वर्तमान व भविष्यकालीन - गुंफलेले 'माझं' बंड या भावनात्मक, वैचारिक आवाहनानंतर शेवटी एका तार्किक, निष्कर्षाला पोहोचते - महाराष्ट्राच्या नवनिर्माणाची जीवनरेषा असलेल्या महाराष्ट्र नवनिर्माण सेनेला मत द्या!'

**संहितेची शैली-वैशिष्ट्ये**

कवितेसारखे 'रूप' असणाऱ्या लिखित संहितेची काही ठळक शैली-वैशिष्ट्ये जाणवतात.

(१) पुनरुक्ती : शब्द, पद, संरचना एवढेच काय विरामचिन्हांच्या स्तरावरही पुनरावृत्ती दिसून येते. 'होय' आणि 'बंड' हे शब्द, ते ज्यात गुंफले आहेत ते वाक्यांश 'होय हे माझे बंड आहे' - हे त्यांच्या सात पुनरावृत्तींमुळे सर्वात लक्षवेधक ठरतात. अवतरणचिन्हे आणि 'होय' नंतरचे स्वल्पविराम या लक्षवेधीपणात भर टाकतात. 'हे माझं बंड आहे' नंतरच्या तीन तीन बिंदू - साखळ्या ही सहा वेळा एकमेकींना समांतर पद्धतीने पुनरावृत्त होतात. या सर्व पुनरावृत्तींच्या त्यांच्या 'दृश्य' परिणामाखेरीज (लक्षवेधीपणा) संपूर्ण संहितेला लय आणि आशयाला ठामपणा प्रदान करतात.

(२) भाववाचक नामे : शब्दांच्या निवडीत अमूर्त भाववाचक नामांवर भर आहे - जसे की 'बंड', 'कामचुकारपणा', 'विकास', 'अस्वच्छता', 'अनारोग्य', 'बकालपणा', 'नवनिर्माण', 'जीवनरेषा'.

(३) वाक्यरचना : वाक्यरचनेच्या बाबतीत समयोगी घटकांची रेलचेल आहे. 'बंड' या मुख्य घटकाच्या वर्णनात्मक असे सहा नाम-केंद्री संच या संहितेत येतात.

काव्यातच साधारणतः दिसणारा 'व्यत्यास' हा विशेष प्रकर्षाने जाणवतो. 'होय, सत्ताधारी पक्षाच्या कामचुकारपणाविरुद्ध हे माझे बंड आहे' अशा सर्वसाधारण, गद्य रचनेऐवजी बंडाचे वैशिष्ट्य दाखवणारे विशेषण-घटक वाक्याच्या शेवटी नाम व क्रियापदानंतर वापरले आहेत.

(४) रूपके : 'शिवधनुष्य', 'जीवनरेषा', 'खुंटवलेला विकास' अशी रूपकेही वापरली आहेत.

**विश्लेषण :**

कुठल्याही संप्रेषणात संदेशाचे पूर्ण आकलन हे नेहमीच पाठ्यबाह्य संदर्भांवर अवलंबून असते. संहितेचे पूर्ण आकलन ही एक सर्जनशील प्रक्रिया आहे. प्रस्तुत केलेल्या संदेशातूनच वाचक असे काही निर्णायक दुवे शोधतो की जे त्याला बाह्य जगाकडे किंवा परिस्थितीकडे घेऊन जातात. प्रस्तुत जाहिरातीला निश्चितच काही पार्श्वभूमी आहे. ही जाहिरातदेखील काही एखाद्या पोकळीत तयार झाली नाही म्हणून आधीच्या सयुक्तिक संहितांच्या किंवा पाठांच्या संदर्भात प्रस्तुत जाहिरातीचा विचार केला पाहिजे. चि०सं० विश्लेषणाचे हे एक महत्त्वाचे साधन आहे - त्यासाठी 'आंतरपाठ्यता' (इंटरटेक्स्ट्युलिटी) अशी संज्ञा वापरली जाते.

चि०सं०वि०चे आणखी एक विश्लेषक तत्त्व चि०सं०वि०ने बोधन मानसशास्त्र (कॉग्निटिव्ह सायकॉलॉजी) व समाजशास्त्र या दोन सामाजिक शास्त्रातून घेतले आहे. त्याला 'समाज-सभासदाचा साधनसाठा' (मेंबर्स रिर्सोस - एम०आर०) असे म्हणता येईल. हेरल्ड गार्नफिंकल या समाजशास्त्रज्ञाच्या मते समाजाचे सभासद या नात्याने लोकांचे समाजातील वर्तन हे स्वानुभवातून त्यांनी तयार केलेल्या काही अपेक्षा आणि गृहीतकांनी नियंत्रित केले जाते. अशी गृहीतके, अपेक्षा, विश्वास  इत्यादी त्यांच्या अबोध मनात साठलेल्या अनुभवजन्य शहाणपणाचा भाग असतात. कुठल्याही आकलन प्रक्रियेत या साधनसाठ्याची भूमिका निर्णायक असते. फेअरक्लोच्या (१९८९) मते अर्थआकलन ही आकलनकर्त्याला संहितेत उपलब्ध असणारी माहिती व त्याच्या मेंदूत किंवा अबोधमनात आधीच साठवलेली माहिती यांच्या मिलाफातून घडणारी एक रासायनिक प्रक्रिया आहे.

वर उल्लेख केलेली ही - (पाठ्यबाह्य संदर्भ, आंतरपाठ्यता आणि समाज-सभासदाची साधनसामग्री) विश्लेषक तत्त्वे ठाकरे यांच्या संहितेला लागू केली तर त्यांच्या जाहिरातीचे डोळस वाचक म्हणून आपल्याला तिचा कुठला गर्भितार्थ कळतो?

या जाहिरातीचा निकटचा तत्कालीन संदर्भ म्हणजे १ फेब्रुवारी २००७ला होऊ घातलेल्या म्युनिसिपल - कॉर्पोरेशनच्या निवडणुकांचे जाहीर होणे. दैनिकात प्रसिद्ध केलेली जाहिरात ही त्यांनी नव्यानेच स्थापन केलेल्या महाराष्ट्र नवनिर्माण सेना या राजकीय पक्षाच्या प्रचार-मोहिमेचा एक भाग होता. जाहिरातीतून जाणवणारा त्यांच्या प्रचाराचा संपूर्ण रोख दिसतो तो 'मी'च्या अवतरणाचिन्हांकित आणि पुनरावृत्तीत बंडावर. हे बंड ते स्वत:च्या ('माझं') एखाद्या मौल्यवान मालमत्तेसारखे मिरवताना दिसतात. पण हे बंड आपण कितपत गांभीर्याने घ्यायचं? भारताचे नागरिक म्हणून आपल्या सामान्य ज्ञानाचा, स्मृति-सामग्रीचा भाग बनलेली अनेक ऐतिहासिक बंडं आपल्याला आठवतात - मंगल पांडेचं बंड. झाशीच्या राणी लक्ष्मीबाईंचं बंड. या ऐतिहासिक बंडांशी तुलना

होऊ शकेल का या बंडाची?

या प्रश्नाचे उत्तर द्यायला धावून येते ती समाज-घटक म्हणून आपण गोळा केलेली आणि अबोध मनात साठवलेली अनुभव व निरीक्षणजन्य साधनसामग्री. या ज्ञान-सामग्रीमुळे आपल्याला नुकत्याच घडून गेलेल्या व माध्यमांनी ठळकपणे प्रसिद्धी दिलेल्या काही घटनांचे संदर्भ आपल्या मनात जागे होतात - त्या संबंधीच्या 'वार्ता'शी या जाहिरातीचे 'आंतरपाठीकरण' केले जाते. मनातल्या मनात आपण एक क्षणभराचा उलटा प्रवास करून येतो : म०न०से०ची स्थापना → शिवसेनेतील फूट → ठाकरे कुटुंबातील सत्तास्पर्धा आणि कलह. बंडाचे हे संदर्भ स्पष्ट झाले की मग त्याचं खरे स्वरूप कळायला लागते. कशाविरुद्ध तर काही अमूर्त कल्पनांविरुद्ध (सत्ताधारी वर्गाचा कामचुकारपणा, खुंटवलेला विकास, अस्वच्छता, अनारोग्य, बकालपणा) आणि कशासाठी तर 'नवनिर्माणा'साठी ही सारी भाववाचक नामे फार 'स्थूल'पणाकडे झुकतात - त्यातून खोल, तर्कसंगत विचारावर आधारित अशा कुठल्याही ठोस योजनांचे आश्वासन मिळत नाही.

यातील संदेशाचा त्यात गुंतलेल्या सहभागींच्या संदर्भात विचार करू गेलो तर या जाहिरातील वीरश्रीआड दडलेली वस्तुस्थिती अधिक स्पष्ट व्हायला लागते. प्रत्येक संज्ञापनासाठी कमीत कमी दोन सहभागींची आवश्यकता असते. पहिला संदेशाचा निर्माता/संबोधक/वक्ता/प्रेषक आणि दुसरा संदेशाचा ग्राहक/संबोधित किंवा श्रोता. प्रस्तुत संज्ञापनाचा म्हणजे जाहिरातीचा संबोधक कोण आहे हे आपण स्पष्टपणे जाणू शकतो. त्याचे 'व्यक्ती'करण अगदी पर्याप्त स्वरूपात झालं आहे - 'माझं' या प्रथमपुरुषी षष्ठी रूपातून. पण संबोधित कोण आहे? कोणतेही जाहिरात-संज्ञापन हे एक सार्वजनिक संज्ञापन असते. संबोधित केलेला श्रोता ही कुणी एक व्यक्ती नसून एक 'समूह' असतो आणि म्हणूनच तो अनिश्चित असतो. प्रस्तुत जाहिरातही त्याला अपवाद नाही. संदेशाचा प्रेषक 'जिगरबाज तरुण-तरुणी' किंवा 'नवनिर्माणाकडे आशा लावून बसलेले सर्वजण' अशा पद-प्रयोगातून श्रोतृवर्गाची ओळख निश्चित करण्याचा प्रयत्न करतो. पण तरीही जाहिरातीचे ग्राहक एक 'समूह' म्हणूनच समोर येतात. 'व्यक्ती' म्हणून नाही.

कोणत्याही एखाद्या उत्पादनाच्या जाहिरातीशी तुलना करता लक्षात येईल की या जाहिरातीत पक्षाचे निर्माते हेच जाहिरातीतील उत्पादन आहे आणि यात मतदार हे 'ग्राहका'च्या भूमिकेत आणले आहेत. अशाप्रकारे ही राजकीय जाहिरात आधुनिकोत्तर काळातील उपभोक्तावादी संस्कृतीचे एक प्रतीक म्हणून समोर येते.

**संदर्भ :**

(१) जवरस्की ॲडम, कुपलंड निकोलस (संपा०) *द डिसकोर्स रीडर*, (१९९९) रूटलेज, लंडन.

(२) फेअरक्लो, नॉर्मन, *लँग्वेज अँड पॉवर*, (१९८९) लाँगमन, लंडन.

(३) *भाषाविज्ञान व वाङ्मयविद्या परिभाषा कोश,* (२००१), भाषा संचालनालय, महाराष्ट्र शासन, मुंबई.
(४) लॉक, टेरी, *क्रिटिकल डिसकोर्स अनॅलिसिस* (२००५), कन्टिनम, लंडन, न्यूयॉर्क.
(५) हॉलिडे, एम्०के० हसन, आर० *कोहिजन इन इंग्लिश लाँगमन* (१९७६), लंडन.

■

## भाषांतरकाराचे दुर्लक्ष

अप्टन सिंक्लेर हा जगप्रसिद्ध समाजवादी लेखक आहे आणि त्याच्या कादंबऱ्या प्रचारात्मक असूनही उत्कृष्ट असतात हा त्यातला विशेष आहे. भाषांतरकाराचे नांव दिलेलं नाही, परंतु सर्व हक्क श्री० व्यं०शं० वकील, बी०ए० यांचे स्वाधीन आहेत असे लिहिले आहे.

भाषांतर म्हणजे काय करायचे असते इकडे भाषांतरकाराचे दुर्लक्ष झाले आहे.

'मी मुक्या कोंबडीइतकाच माहितगार आहे.' (पान ९४), यावरून कोणाला काय समजेल? यात फ्रेंच आणि जर्मन उच्चार चुकीचे दिलेच आहेत, पण इंग्रजी उच्चार देखील चुकले आहेत, उदाहरणार्थ 'बॉम, बॉमर, सार्डीन' यांऐवजी 'बॉब, बॉबर, सार्डीअिन' असे उच्चार दिले आहेत. काही ठिकाणी निष्कारण परकी शब्द वापरले आहेत. जखमेला 'बॅंडेज' ऐवजी पट्टी बांधली तरी चालते.

शेवटी विशेष महत्त्वाची चूक म्हणजे, 'दहा चौरस फुटांच्या एका खोलीत तीन विवाहित जोडपी रहात होती हे मी स्वतः माझ्या डोळ्यांनी पाहिलंय (पा० ३२). आपण लिहितो त्याचा अर्थ काय होतो इकडे लक्ष न दिल्यामुळे ही चूक झाली आहे. अर्थात चुकीचे एक कारण म्हणजे इंग्रजीतील दोन वाक्प्रचार 'टेन फीट स्क्वेअर' आणि 'टेन स्क्वेअर फीट' यांतला फरक भाषांतरकाराला कळलेला नाही. त्याने 'टेन फीट स्क्वेअर' लिहिले असले पाहिजे, पण त्याचा अर्थ दहा चौरस फूट नसून दहा फूट लांब व दहा फूट रुंदीची खोली, म्हणजे १०० चौरस फूट असा होतो. दहा चौरस फूट क्षेत्रफळ असल्यास ती खोली ४ × २॥ किंवा ५ × २ अशी काहीतरी असली पाहिजे. तीत एका मनुष्याला देखील राहता येणार नाही, मग तीन विवाहित जोडपी कशी राहणार?

र०धों० कर्वे : 'समाजस्वास्थ्य' १७:४, ऑक्टोबर १९४३ : पाने ८६-८७ : अप्टन सिंक्लेर यांच्या 'नो पासारान' या कादंबरीच्या त्याच शीर्षकाच्या भाषांतरित पुस्तकाचे परीक्षण. (मूळ पुस्तकाचे भाषांतरकार : व्यंकटेश शं० वकील, लोकसाहित्य, मुंबई, १९४३)

आपले वाङ्मयवृत्त, सप्टेंबर २०११, पृ०१६

# पोतराजाची लोकगीते

माधवी सुरेंद्र पवार

कोणत्याही भाषेत लिखित साहित्याची निर्मिती होण्यापूर्वी मौखिक परंपरेने चालत आलेले लोकसाहित्य अस्तित्वात असते. लोकसाहित्यामध्ये लोककथा, लोकगीत, लोककथागीत, म्हणी, वाक्प्रचार, लोकनाट्य, प्रयोगरूप लोककला अशा गोष्टींचा समावेश होतो. त्यामधून लोकजीवनात रूढ असणाऱ्या नैसर्गिक शहाणपणाचीही अभिव्यक्ती झालेली असते. यातील लोकगीत हा लोकसाहित्याचा महत्त्वाचा घटक आहे. या लोकगीतांना शेकडो वर्षाची परंपरा लाभली आहे. लोकगीत हे एका पिढीकडून दुसऱ्या पिढीपर्यंत चालत आलेले असते. मराठी लोकसंस्कृतीचे चित्रण लोकगीतातून व्यक्त झालेले आढळते. लोकगीतामध्ये स्त्रियांची, पुरुषांची, लहान मुलांची, आदिवासींची आणि लोकसंस्कृतीच्या उपासकांची गीते यांचा समावेश होतो. यामधील लोकसंस्कृतीच्या उपासकांमध्ये पोतराज, वाघ्यामुरळी, वासुदेव, गोंधळी, पांगुळ, बहुरूपी, धनगर, डहाक यांचा समावेश होतो. यामधील लोकसंस्कृतीच्या उपासकांमधील पोतराजाची गाणी महत्त्वाची आहेत. आता शिक्षणाचा प्रसार होत असल्यामुळे पोतराजाच्या परंपरेत बदल होत आहेत. म्हणून या प्राचीन परंपरेवर येथे लक्ष वेधले आहे. पोतराज हा मरीआई या ग्रामदेवतेचा उपासक असतो. लोकसंस्कृतीचा हा उपासक उग्र भीषण रौद्र अवताराचा म्हणून मराठी लोकजीवनाला चांगलाच परिचित आहे. पोतराज ही प्रथा विदर्भात जास्त प्रमाणात आढळते. विशेषतः मातंग समाजाचं ते दैवत आहे. पोतराज प्रथेचा मुख्य पाया मांगरिबाबापासून होतो. मातंग समाजाचं दैवत असलेल्या मांगरिबाबाच्या यात्रा भरतात. पुणे, मालेगाव, औरंगाबाद, बोंद्रा, मंगरूळ, खानदेशात अमळनेर, चांदनकुऱ्हे, बीड जिल्ह्यातील होळ इ० जिल्हा तालुक्याच्या ग्रामीण परिसरातून या मांगरिबाबाच्या यात्रेसाठी हजारो भाविक येतात.

'पोतराज' हा शब्द तमिळ भाषेतील 'पोट्टुराझ' या शब्दाचा मराठी अपभ्रंश आहे. मरीआईला गौरवाने 'लक्ष्मीआई' असेही म्हणतात. त्यामुळे पोतराज हा मरीआईवाला किंवा लक्ष्मीआईवाला या नावाने ओळखला जातो. पोत्तुराजु हा शब्द तमिळ भाषेतील 'पोट्टुराझ' शब्दाचे रूपांतर आहे. शब्दाप्रमाणे पोतराजाचे आचरण, पूजापद्धती, नृत्य इ० वर, द्रविड संस्कृतीचा प्रभाव असतो. दक्षिणेत 'सातबहिणी' या नावाच्या ग्रामदेवी प्रसिद्ध आहेत. त्याचा भाऊ असलेल्या एकाला पोत्तुराजु म्हणतात.



अनुक्रमणिका

पोतराज आणि कडकलक्ष्मीवाला या परंपरा परस्परांहून वेगळ्या आहेत. कडकलक्ष्मीवाले हे मूळचे आंध्रप्रदेशातील तेलुगु भाषिक असतात. पोट भरण्यासाठी डोक्यावर मरीआईचे देऊळ घेऊन ते भटकत महाराष्ट्रात येऊन स्थायिक झाले. अंगावर आसूड मारून घेणे, दंडात सुया टोचून रक्त काढणे, स्वत:च्या दातांनी मनगटाचा चावा घेणे असे क्लेश तो करून घेत असतो. स्वत:ला क्लेश करून देवीला प्रसन्न करून घेण्याचा अघोरी मार्ग त्याने अवलंबलेला दिसतो. महाराष्ट्रात असे कडकलक्ष्मीवाले आढळतात.

पोतराजाच्या जीवनाचे समग्रदर्शन पार्थ पोळके यांच्या 'आभरान' या आत्मकथनात आढळते. मरीआई किंवा लक्ष्मीआईच्या नावाने भिक्षा मागताना, धार फिरवणे, मरीआईचा गाडा, बढण, यासारख्या विधीप्रसंगी पोतराज विविध प्रकारची गाणी गातो. ही गाणी वंशपरंपरेने त्याने आत्मसात केलेली असतात. लहान असताना आपल्या पोतराज वडिलांसह भिक्षा मागताना व पोतराजाच्या मेळात वावरताना त्यांच्या कानावर ही गाणी पडलेली असत. मरीआई ही शंकर व पार्वतीच्या रूपात असल्यामुळे पोतराज हा या शक्तीचा मुख्य आधार शिवशंकर याला साकडे घालत असतो. पोतराज हा मरीआईचा उपासक असला तरी शंकराला प्रथम नमस्कार करतो. यमाई, अंबाबाई, जगदंबा या शक्तिपंथातील देवता आहेत. दुर्गामाता, यल्लमा, रेणुका या सर्व देवता आदिशक्ती पार्वतीची रूपे आहेत.

देवीचे शिव व शक्तिरूपातील माहात्म्य खालील गीतात मांडले आहे :

''पहिला जपु मुरू गणेशा
दुसरा जपु वारूळ देशा
तिसरा जपु जोतकी माया
चौथा जपु साथिला शंख
औऔ पातालमें कर्त्रोमे
हातमें तागा पाव मे धागा
अलंग बुवा, मलंग सोन्याचा पलंग
रुपेरी झारी, आदि छाया मग धर्तरी
आकाश मग प्रसवी
प्रसवी आलगा साळुका
तोच कैलास नायका.''

या पोतराजाच्या गाण्यातही पहिल्यांदा गणेशाला नमन केले जाते. यातून देवीचे शिव व शक्ती या रूपातील माहात्म्य सांगितले आहे.

---

**पोतराजाच्या गाण्याचे वर्गीकरण :**

१. स्फुटगीते

पोतराजाची गाणी स्त्री गीतातील ओवीरचनेसारखीच असतात. आशयातही बराच तोचतोचपणा असतो. त्याची गीतरचना ओवीसारखी असली तरी गीत गाण्याची लय, सुरावट व पोतराजाचे गीत सादरीकरण मात्र वेगळे असते. पोतराजाच्या स्फुटगीतांतून मरीआईचे किंवा लक्ष्मीआईचे रूप-गुण वर्णन केलेले असते. चांद्याची धुरपतामाई-लक्ष्मीआई-मरीआई आणि मसोबा यांची स्तुतिपर गाणी पोतराजाच्या एकूण गीतांचा एक महत्त्वाचा विशेष आहे.

''चांदगडच्या वाटं, नाही पापाची वासना
पतिव्रतेला सोसंना, धुरपता माय ।।
चांदगडच्या वाटंला, तहान लागलीया बाळाला
झरे फोडिले माळाला, कसे मध्या धुरपतानं ।।
चांदेगडामंदी नवलाखी सोनार
कोपऱ्याची लेणार, धुरपता माय ।।''

याप्रमाणे पोतराज चांद्याच्या आईचे गुणगान आत्यंतिक श्रद्धाभावाने आपल्या गीतांतून करतो. महाराष्ट्राच्या खेड्यापाड्यात आजही मरीआई या देवतेचे माहात्म्य असलेले दिसून येते. मरीआईची साथ येणे किंवा आईचा कोप होणे या गोष्टीला लोक अजूनही वचकून असलेले दिसतात. तिच्याबद्दल पोतराज म्हणतो,

''आलीया मरीबाई
तिनं गाड्याला केला साज
हाती कोरडा त्याला बाक ।।धृ।।
आलीया मरीबाई
तिचा कळेना अनुभऊ
भल्याभल्यांचा घेती जीवू
आलीया मरीबाई''

भल्याभल्यांचा जीव घ्यायला देखील मागेपुढे न पाहणाऱ्या या मरीबाईबद्दल म्हणूनच भीतीची भावना लोकांच्या मनात असते. पण या मरीबाईला आंबीलीचा नैवेद्य दाखवा. तिची उपासना करा म्हणजे ती तुमचा सांभाळ करते, असा विश्वास पोतराजाला वाटतो.

पोतराज मंगळवारी आणि शुक्रवारी गावात येतो. मरीआईचा फेरा आल्याची घोषणा तो करतो. गाणी म्हणतो,

''आई मरीमाता
एकाचे एकवीस

पाचाचे पन्नास
येल मांडवाला जावू दे
ताक आमरूतानं डेरं धुमू दे
कपाळाचं कुंकू
हाताचा चुडा
पायातलं जोडवं
यसवंत राक लकसीमी.''

या गाण्यातून लोकांना आशीर्वाद देतो.

मरीआईच्या कोपाने रोगराई फैलावते आणि लोक मरतात असा लोकसमज व्यक्त होतो. मरीआईची कृपा संपादन करण्यासाठी, प्रसन्न करून घेण्यासाठी तिची विविध प्रकारे उपासना चालते.

पोतराजाच्या पारंपरिक गीतांतील काही गीतांचा अपवाद वगळला तर त्याची बरीच गीते दुर्बोध, काहीशी अर्थहीन पण तालबद्ध असतात. शब्दांच्या जडणघडणीकडे, त्यांच्या सुसंगत रचनेकडे फारसे लक्ष दिलेले नसते. असेच एक गीत पुढीलप्रमाणे :

''हर हर हरा
ध ध ध ध ध धा
मायचा खैऱ्या, कोंबड्या रेड्या
भरलीन दुरड्या
उढतीन खारूड्या
हर हर हरा, ध ध ध ध धा ।।
होर होर होर, माय तुज करणी
मज प्रार्थ । लावतो चरणी ।।

अर्थात पोतराजाच्या अंगात आल्यावर अशा प्रकारचे गीत त्याच्या ओठांतून बाहेर येते. शरीराच्या विशिष्ट हालचाली घुमण्याची क्रिया आणि मधूनमधून वरीलप्रमाणे गीतांचा चरण त्याच्या तोंडातून बाहेर पडतो. त्यामुळे अर्थहीन शब्दरचना त्याच्या गीतातून पाहावयास मिळते.

२. धुपारतीच्या वया

पोतराजाच्या गीतांचा महत्त्वाचा भाग म्हणजे धुपारतीच्या वया किंवा वह्या. यालाच 'धुपात्री' किंवा धुपारतीच्या वेळी म्हणण्यात येणाऱ्या पोतराजाच्या वह्या म्हणतात. या वया तो आपल्या धर्मविधीप्रसंगी मरीआईच्या उपासनेत म्हणतो. या वया म्हणजे त्या विधीचे मंत्र होत असे म्हणता येईल. पोतराजांच्या घरपरत्वे या वयांत बदल झालेला दिसते. या वया वेगवेगळ्या प्रकारच्या असतात.

बढणाच्या विधीतील 'जळपूजनाच्या' प्रसंगी म्हटल्या जाणाऱ्या धुपारतीच्या काही वया पुढीलप्रमाणे :

''जळ नेमलं जळं थोपलं
जळाच्या काठी झोटिंग झोटी,
साती आसरा, आठवा म्हैशासुरा,
जळात लक्ष्मी जळात उभी राही.
तुजकार पोतराज मी धुपार्ती बाईची घडी घडी करी ॥''

धुपारतीच्या वयांना पोतराजाच्या धर्माचरणात अत्यंत महत्त्व असते. या वया तो नेहमी गात नाही तर विधीप्रसंगीच त्याचे गायन करतो. नृत्य आणि संगीताची साथ त्या वया गाताना फारशी महत्त्वाची मानली जात नाही.

३. कथात्मगीते

पोतराजाच्या कथागीतांतून लोकमानसाचा आविष्कार होत असतो. ओवीगीते, धुपाऱ्या, वह्या यांच्या जोडीलाच कथागीते गायिली जातात. जागरणाच्या विधीच्या वेळी कथागीते म्हटली जातात :

''पहिले नमन गणरायासी
दुसरे नमन मात्यापित्यासी
तिसरे नमन गुरूच्या चरणाशी
चौथे नमन उगवत्या सूर्यासी
पाचवे नमन पाची पांडवासी
सहावे नमन सकळ जनांसी
सातवे नमन साती आसरासी
आठवे नमन महिषासुरांसी
नववे नमन नवनाथासी
दहावे नमन दहा अवतारासी.''

अशाप्रकारे पोतराज गीतांतून कथा सांगत असतो. पोतराजाच्या कथागीतांचे विषय पुढीलप्रमाणे :

(अ) होमातून आईचा अवतार (ब) मुंबादेवीची कथा
(क) पंढरपूरचा तुकडा (ड) मरीअम्माची कथा
(इ) भिल्लिणीची कथा

पोतराजाची कथागीते अभिनयासह गायिली जातात. कथा ही अभिनयासह सांगितली जात असल्यामुळे हे कथन एक विशिष्ट सुरात डफावर चालू असते. मधूनच कथन थांबवून पोतराज नाचू लागतो. एका कथेतून दुसरी कथा गुंफून जात असल्यामुळे

रात्रभर हा कार्यक्रम चालतो. ठेक्यात सांगण्याची पद्धत असल्यामुळे त्याला तालबद्धता येते. अशाप्रकारे पोतराजाची गीते ही मराठी लोकसंस्कृतीचा अविभाज्य भाग आहेत.

**साधन ग्रंथ सूची**


१. कांबळे बळवंत, *'देवदासी पोतराज, वाघ्यामुरळी रूप-स्वरूप-विकृती'*, प्रतिमा प्रकाशन, पुणे, प्रथमावृत्ती, जून १९९९
२. ढेरे रा०चिं०, *'लोकसंस्कृतीचे उपासक'*, पद्मगंधा प्रकाशन, पुणे.
३. मांडे प्रभाकर, *'लोकसाहित्याचे स्वरूप'*, परिमल प्रकाशन, औरंगाबाद, (दुसरी आवृत्ती), १९९७.
४. शिंदे विश्वनाथ, *'शोधयात्रा रंगभूमीची'*, पद्मगंधा प्रकाशन, पुणे. २००९.


■

## अनुवादित कलाकृतीतून नवे भान

गो०म० कुलकर्णी यांना एकदा मी एक प्रश्न विचारला होता, ''कर्नाटकात 'वंशवृक्ष' ही कादंबरी तिथल्या पुरोगामी समीक्षकांनी एक प्रतिगामी कलाकृती मानली. त्या मंडळींना या कलाकृतीच्या महाराष्ट्रातल्या यशाविषयी आश्चर्य वाटतं. तुम्हाला यामागचे कारण काय वाटते?''

यावर त्यांनी उत्तर दिले होते, ''महाराष्ट्रात शंकरमामंजींना खलपुरुष म्हणून रंगवले गेले. त्याच पठडीतल्या श्रोत्रींच्या बाजूला भैरप्पांनी न्याय देऊन त्यांची बाजूही आमच्यासमोर आणली. आज जेव्हा मराठी वाचक आपली मुळे तपासायच्या मूडमध्ये आहे, तेव्हा त्याला हे अधिक पटतंय.''

एका विशिष्ट परंपरेतून तयार झालेले लेखक एकसारखाच विचार करताना दुसऱ्या भाषेतल्या लेखकाने थोडे वेगळे भान दिले की तेही वाचकांना हवे असते, असे दिसते.

याचाच दुसरा अर्थ भैरप्पांचे मूल्यमापन मूळ भाषेतल्या समीक्षकाने वेगळ्या प्रकारे केले आणि मराठीतल्या समीक्षकाने वेगळ्या प्रकारे केले. या दृष्टीने पाहिले तर प्रत्येक भाषेतली महत्त्वाची कलाकृती दुसऱ्या भाषेत वेगळ्या प्रकारे तोलली जाते.

उमा कुलकर्णी (*'भारतीय भाषांतील अनुवादित कादंबरी'*)
ललित, नोव्हेंबर-डिसेंबर २०११, पृ० १५७

दखलयोग्य

# भाषा आणि संस्कृती

-

भारतीय शिक्षणपद्धतीत त्रिभाषा सूत्र मान्य केल्यानंतर आता त्याला वेगवेगळे फाटे फुटायला लागले असून स्थानिक भाषा सक्तीची करण्याच्या निर्णयाला आव्हान देणारी याचिका न्यायालयात सादर केली आहे. केंद्रीय पातळीवरील शिक्षणक्रम शिकवणाऱ्या शैक्षणिक संस्थांमध्ये त्या त्या राज्यातील भाषा शिकवणे सक्तीचे करू नये, तसेच आपले अभ्यासक्रम ठरवण्याच्या आपल्या अधिकारावरही अतिक्रमण होऊ नये, अशी याचिकाकर्त्यांची भूमिका दिसते. भारतामध्ये भाषावार प्रांतरचना करण्याचा निर्णय घेताना पंडित नेहरू यांनी जे विचार मांडले होते, त्यामध्ये स्थानिक भाषेचे महत्त्व अधोरेखित केले होते. देशातील प्रत्येकाने हिंदी ही राष्ट्रभाषा, इंग्रजी ही जागतिक भाषा आणि त्या त्या राज्यातील स्थानिक भाषा शिकण्याने 'विविधतेत एकता' निर्माण होईल, असा त्यांना विश्वास होता. हे सूत्र दक्षिणेकडील प्रांतांनी साफ धुडकावून लावले आणि इंग्रजी व स्थानिक भाषांवरच लक्ष केंद्रित केले. सीबीएससीसारख्या अभ्यासक्रमांमध्ये स्थानिक भाषेला नेहमीच दुय्यम स्थान असते. म्हणजे आपल्याकडील पाचवीचे मराठी तेथे आठवी किंवा नववीला असते, एका अर्थाने ती भाषेची ओळखच असते. भाषा शिकणे म्हणजे एका संस्कृतीशी ओळख करून घेण्यासारखे असते. कितीही भाषा शिकल्याने कोणत्याही विद्यार्थ्याच्या शैक्षणिक आणि लौकिक जीवनावर विपरीत परिणाम होण्याची शक्यता जगातील एकाही शिक्षणतज्ज्ञाने आजवर व्यक्त केली नाही. असे असतानाही भारतातील शिक्षणव्यवस्थेत इंग्रजीलाच सातत्याने प्राधान्य दिले गेले. मराठी माध्यमातील विद्यार्थ्यांना हिंदी आणि इंग्रजी यायला हवे, याबद्दल वादच नाही. आपल्या गुणांच्या स्पर्धेत या दोन्ही भाषा 'ऑप्शन'ला टाकण्याची प्रवृत्ती वाढत आहे. इंग्रजी माध्यमांच्या शाळांनी भाषाविषय सक्तीचा न करण्याची केलेली मागणी अनाकलनीय असली, तरीही त्यामागे एखाद्या भाषेबद्दलचा तिटकारा असता कामा नये, अशी अपेक्षा करणे निश्चितच गैर नाही. बदली होणाऱ्या कर्मचाऱ्यांच्या मुलांना सतत वेगवेगळ्या प्रांतांमध्ये जावे लागते, त्यामुळे त्यांच्या मुलांना प्रांतोप्रांतीच्या भाषा शिकाव्या लागतात, असा जो सूर लावला जातो, तोच मुळी चुकीचा आहे. भाषा शिकल्याने मुलांच्या ज्ञानात भर पडण्याची आणखी एक खिडकी उघडी होते याचे भान या पालकांनाही असायला हवे. महाराष्ट्रात राहून मराठी न शिकण्याबद्दलचा हा हट्ट अन्य प्रांतात खपवून घेतला

जातो का, याचाही विचार करण्याची गरज आहे. भाषा ही कोणत्याही परिसराचा आत्मसन्मान जपण्याची एक महत्त्वाची खूण असते. परिसरातील नागरी जीवनाशी एकरूप होण्याची ज्यांना गरज वाटत नाही, त्यांना जागतिक पातळीवर कोणत्याच संस्कृतीमध्ये मिसळणे शक्य होत नसते. भारतासारख्या देशात अनेक भाषांचा संगम होतो, तेव्हा तेथील शिक्षणपद्धतीमध्ये एकापेक्षा अधिक भाषा अंतर्भूत असणे आवश्यकच ठरत असते. इंग्रजीचा बडिवार माजवून स्थानिक वा राष्ट्रीय भाषेला डावलल्याने परीक्षेत गुण अधिक मिळतील कदाचित, परंतु जगण्यासाठी आवश्यक असणाऱ्या सांस्कृतिक घटकांपासून तो विद्यार्थी नेहमीच वंचित राहील. महाराष्ट्रातील ज्या शाळा येथील अभ्यासक्रमानुसार चालतात, तेथे त्रिभाषा सूत्र असण्यास कुणाचा विरोध नाही, मात्र केंद्रीय पातळीवरील अभ्यासक्रमात स्थानिक भाषांची लुडबूड नको, अशी भूमिका दीर्घ काळासाठी मुळीच उपयोगी नाही. देशाच्या सांस्कृतिक विविधतेशी ओळख करून घेण्याचा भाषा हा राजमार्ग आहे. दुर्दैवाने महाराष्ट्रातही अन्य भाषांबद्दल फारसा जिव्हाळा दिसून येत नाही. इतर भाषांशी आपणही फटकून वागतो आणि आपल्या भाषेचाही अभिमान बाळगत नाही, अशा धेडगुजरी अवस्थेत सध्या महाराष्ट्र आहे.

(लोकसत्ता, दि० १७ नोव्हेंबर २०११) ■

## भाषांतरातून विनोदनिर्मिती!

स०आ० जोगळेकरांनी सांगितलेली एक गोष्ट इंग्रजी वाक्याच्या भलत्या तर्जुम्याची गंमत दाखवते. जुन्या काळी कोर्टात असा रिवाज असे, की न्यायाधीशांनी आरोपी, पक्षकार वा साक्षीदार यांच्याशी थेट न बोलता शिरस्तेदारामार्फत बोलायचे. पुष्कळदा मॅजिस्ट्रेट वा सबजज्ज इंग्रज अंमलदार असायचा. शिरस्तेदाराला त्यांचा इंग्रजी आदेश मराठीत भाषांतर करून सांगावा लागायचा. एकदा एका घटस्फोटाच्या मामल्यात पत्नीचा वादीपक्ष होता. जज्जसाहेबांना उभय पक्षांचे साक्षीपुरावे ऐकून निकाल सांगितला, 'टेल हर द कोर्ट इज प्लीज्ड टू ग्रँट यू अ डिव्होर्स.' त्याने आपल्या कुवतीप्रमाणे अनुवाद केला. 'बाई! साहेब तुमच्यावर खूष आहेत. त्यांनी तुम्हाला घटस्फोट मंजूर केला आहे.'

दुसरी घटना द० महाराष्ट्रातली. एक आयसीएस कलेक्टर नव्यानेच कामावर रुजू झाले होते. कामापुरते मराठी येत असल्याचे प्रमाणपत्र त्यांच्यापाशी होते. एक तारखेला पगाराचे पाकीट हाती पडल्यावर त्यांनी दारावरच्या पट्टेवाल्याला बोलावून विचारले, 'हा पगार घेऊन तू पळून जाशील का?' त्याने नकारार्थी मान हलवली. साहेब रागावले. थयथयाट आरंभला. सुदैवाने एका प्रांतसाहेबांच्या ध्यानी हा प्रकार आला. साहेबांना 'पळत जाशील का?' म्हणायचे होते!

श्री०बा० जोशी, *गंगाजळी*-२, पृष्ठ २०६

# अनुवाद - एक व्यवसाय

वि०गं० नेउरगावकर

[ या नव्या सदरामध्ये 'भाषा आणि जीवन'च्या पूर्वीच्या अंकातील मौलिक मजकूर वाचकांसमोर आणीत आहोत. संपादक ]

भाषांतराचा जन्म बहुधा भाषेच्या जन्मापासूनच झाला, असे म्हटल्यास फार अतिशयोक्ती होईल, असे वाटत नाही. परंतु अनुवाद करणे हा व्यवसाय बनण्यास मात्र अनेक शतके लागली, ही तितकीच खरी गोष्ट आहे. सुरुवातीला दैनंदिन जीवनातील व्यवहार समजून घेण्यापुरतेच भाषांतर करणे सीमित राहिले असेल. परंतु मानवाच्या सर्वांगीण उन्नतीबरोबरच भाषाभिवृद्धी होत गेली. निरनिराळे धर्म व धर्मग्रंथ उदयाला आले व त्याचबरोबर तत्त्वज्ञान, अध्यात्म, साहित्य, इत्यादी विषयांमध्ये प्रगती झाली व ज्ञानलालसेपोटी अनुवाद करणे जरुरीचे झाले. आचारविचार, साहित्यातील सौंदर्य ह्यांसारख्या गोष्टी जाणून घेण्याची उत्सुकता वाढली. भाषांतराचा दर्जा सुद्धा खूप उंच होता, हेही विधान वावगे मानता येणार नाही. उदाहरणार्थ, प्रसिद्ध जर्मन कवी गटे ह्याने ज्या वेळी शाकुंतलाचे संस्कृत-इंग्रजी-जर्मन भाषांतर वाचले, त्या वेळी तो अक्षरशः नाचला, असा प्रवाद आहे. भाषांतराची पातळी जरी खूपच वरची असली, तरी भाषांतराकडे जास्त करून कला म्हणून पाहिले जाई. त्याला व्यावसायिक स्वरूप आले नव्हते.

युरोपमध्ये औद्योगिक क्रांती घडून आली, तेव्हापासून विज्ञान व तंत्रज्ञान ह्या दोन विषयांची झपाट्याने प्रगती झाली व आज आपण विसाव्या शतकात विज्ञानाचा विस्फोट झाल्याचे अनुभवत आहोत. ह्या सर्व बदलांमुळे भाषांतर करण्याला सुद्धा व्यावसायिक स्वरूप येऊ लागले. भारतात अजून सुद्धा अनुवाद-व्यवसाय बाल्यावस्थेत आहे व मुख्यत्वेकरून शास्त्रीय व तांत्रिक विषयांमध्येच अनुवादाला मागणी जास्त आहे.

भाषांतर करताना मूळ मजकुराशी इमान राखलेच पाहिजे; परंतु ह्याचबरोबर भाषांतरात बोजडपणा येता कामा नये. शास्त्रीय किंवा तांत्रिक भाषांतरकाराला नुसत्याच दोन्ही भाषा चांगल्या अवगत असून उपयोग नसतो. त्याला त्याचबरोबर त्या विषयाचे थोडे तरी ज्ञान असावे लागते.

भाषांतरकारावर आणखी एक मोठी जबाबदारी असते, ती म्हणजे गोपनीयतेची.

कारण आजकाल जे विदेशांमधून तंत्रज्ञान येते, त्याकरता बरीच मोठी किंमत मोजावी लागते. व अशी माहिती जर भाषांतरकाराकरवी दुसऱ्याच्या हातांत पडली, तर मोठे नुकसान घडण्याची शक्यता असते. एकदा एका कंपनीने माझ्याकडे जवळपास ४० पाने भाषांतर करण्यास पाठविली. त्यांना साहजिकच ते काम लवकर करून पाहिजे होते. मी त्यांना सुचविले, की मी काही भाग माझ्या मित्राकडून करवून घेतो. म्हणजे त्यावर मला वेळ सांभाळता येईल. त्यावर मला सांगण्यात आले, की आमचा तुमच्यावर विश्वास आहे, तसा तुमच्या मित्रावर असणे शक्य नाही, कारण आम्हांला त्याचा अनुभव नाही. तेव्हा तुम्ही चार दिवस जास्त लावले तरी चालेल, पण काम मात्र तुम्ही एकट्यानेच करा.

एकूण पाहता अनुवादाला आज मागणी खूप आहे व त्याला प्रतिष्ठाही लाभली आहे. खाजगीरीत्या केलेल्या कामाचा मोबदला सुद्धा बऱ्यापैकी मिळू लागला आहे. दोन्ही भाषांमध्ये उलटसुलट भाषांतर करता आले, तर फारच चांगले. जर्मन-इंग्रजी, इंग्रजी-जर्मन अशा दोन वेगळ्या जोड्या अनुवादाच्या दृष्टीने मानल्या जातात. हे एक उदाहरण झाले. त्याचबरोबर इतरही काही भाषांचे जुजबी जरी ज्ञान अवगत केले, व अनुवाद 'व्यवसाय' म्हणून निवडला, तर त्याची खूपच मदत होते. तेव्हा मराठी भाषकांनी ह्या अनुवादाच्या क्षेत्रात लक्ष घातले, तर स्वागतार्हच, असे म्हणता येईल. जाता जाता एकच महत्त्वाचे व्यावसायिक गुपित सांगावेसे वाटते, ते म्हणजे, भाषांतराचा दर्जा कितीही चांगला ठेवला, तरी भाषांतरकाराने व्यवसायात पडावयाचे असल्यास वेळेलाही तितकेच महत्त्व दिले पाहिजे.

[ 'भाषा आणि जीवन', वर्ष ११, अंक १-२ (अनुवाद विशेषांक-उत्तरार्ध) पृ० ५७ ते ६०मधील संपादित अंश ]

■

## तिसाव्या वर्षातील पदार्पणाच्या निमित्ताने

'भाषा आणि जीवन'ला मान्यता आणि प्रतिष्ठा मोठ्या प्रमाणावर मिळाली असली तरी त्याला पुरेसे वर्गणीदार लाभलेले नाहीत. महाराष्ट्रात विद्याक्षेत्रीय गंभीर वाचन करणाऱ्यांची - मराठीचे अध्यापक, प्राध्यापक, विद्यार्थी आणि लेखक यांची - संख्याच तुटपुंजी आहे, की आपल्या खिशातील पैसे खर्च करून 'भाषा आणि जीवन'सारखे नियतकालिक नियमितपणे मिळण्यासाठी वर्गणीदार होण्याचे महत्त्व त्यांच्या लक्षात येत नाही? आपण मनावर घेतले तर 'भाषा आणि जीवन' स्वावलंबी होईल! आपला सक्रिय प्रतिसाद अपेक्षित आहे.

# परिभाषा-निर्मितीचे कार्य

श्रीनिवास नारायण बनहट्टी

[साठ वर्षांपूर्वीचा हा लेख आजही महत्त्वपूर्ण ठरतो. संपादक]

स्वातंत्र्य मिळाल्यापासून ज्या अनेक प्रश्नांना महत्त्व आलेले दिसते त्यांत भाषेच्या प्रश्नाची प्रामुख्याने गणना करावी लागेल. या प्रश्नाचे दोन विभाग पडतात. परकीय भाषा इंग्रजी, राष्ट्रभाषा हिंदी आणि प्रादेशिक भाषा बंगाली, तेलुगु, मराठी, तामीळ इ० यांचे आपल्या राष्ट्राच्या व त्यांतील राज्यांच्या सामाजिक व सरकारी व्यवहारांत काय स्थान असावे आणि या भाषांचा परस्पर संबंध कसा असावा, हा या महान प्रश्नाचा एक विभाग होय. निरनिराळ्या राज्यांमध्ये सरकारी कामकाजाच्या भाषा कोणत्या असाव्या, देशांतील माध्यमिक व उच्च शिक्षण कोणच्या भाषेतून देण्यांत यावे, हे व असेच सध्या वादग्रस्त होऊन बसलेले पोटप्रश्न या विभागात अंतर्भूत होतात. थोडक्यात म्हणायचे तर या विभागाला 'भाषिक राजकारण' असे नाव देणे योग्य होईल. निखालस राजकारण म्हणून जे समजले जाते, त्याच्याशी या विषयाचा निकट संबंध येतो - आणला जातो, हे एक; आणि भिन्न भिन्न भाषांच्या परस्पर संबंधांत एकमेकांचे हक्क, आक्रमण अथवा दडपण इत्यादी भावनोद्दीपक मुद्दे उपस्थित केले जातात, हे दुसरे;-या दोन्ही कारणांस्तव 'भाषिक राजकारण' असे नाव या विभागाला देणे रास्त ठरेल.

भाषाविषयक महान प्रश्नाचा दुसरा विभाग विधायक (constructive) आणि पंडिताऊ (academic) स्वरूपाचा आहे असे म्हणता येईल. आपली राष्ट्रभाषा हिंदी आणि प्रादेशिक भाषा बंगाली, तेलुगु इत्यादी, यांना सर्व प्रकारच्या सामाजिक व सरकारी व्यवहारांची गरज पुरी पाडण्याइतके समर्थ कसे बनवावे याचा विचार या विभागात अंतर्भूत होतो. प्रस्तुत लेखात याच विभागाचा विचार करण्याचे योजिले आहे. राजकारणी लोक भाषांचे राजकारण लढवितील. पण भाषांचे सामर्थ्य वाढले नाही तर, ते राजकारणही फोल ठरेल व आपल्या देशाचे भाषिक स्वातंत्र्य दृष्टिपथात येणार नाही.

भौतिक शास्त्रांच्या प्रगतीच्या पूर्वी दोनतीनशे वर्षे पाश्चात्त्य राष्ट्रांनी वैचारिक प्रगतीला आरंभ केला होता. विचारक्रांतीच्या या युगाला 'नवचैतन्य' (Renaissance) असे अभिधान आहे. तेव्हापासून पाश्चात्त्य राष्ट्रांनी जगभर आवाढाव करून राजकारण, कायदा, राज्यशासन, व्यापार आणि अर्थव्यवहार यांचा व्याप इतका वाढविला की प्रत्येक क्रियेचे आणि व्यवहाराचे

अनेक सूक्ष्म, सूक्ष्मतर भेदप्रभेद निर्माण झाले; आणि या व्यवहारवृद्धीबरोबरच समांतर रीतीने त्यांच्या भाषाही वाढत गेल्या. दुर्दैवाने याच काळात आपल्या देशाची सामाजिक, राजकीय व आर्थिक प्रगती थांबून आपला देश बौद्धिक व वैचारिक दृष्ट्या केवळ 'थंड गोळा' झाला होता. अर्थात आपल्या भाषाही खुंटलेल्या अवस्थेत राहिल्या.

समाजाच्या विचारात व व्यवहारात येणाऱ्या सूक्ष्मतेमुळे भाषेची अभिवृद्धी कशी होत जाते यांची सर्वांना समजण्याजोगी एकदोन उदाहरणे देता येतील. आपल्या देशात जुन्या काळी न्यायदानाच्या पद्धतीत दिवाणी (सिव्हिल) आणि फौजदारी (क्रिमिनल) हा भेद नव्हता. फौजदारीला इंग्रजीत प्रोसेक्युशन म्हणतात; व दिवाणी दाव्याला सूट म्हणतात. आपल्या स्मृतींमध्ये 'अभियोग' हा शब्द आढळतो. पण तो सर्व प्रकारच्या न्यायप्रविष्ट तक्रारींना उद्देशून वापरलेला दिसतो. त्यांत दिवाणीफौजदारीचा भेद नाही. याचा अर्थ हा, की समाजाच्या व्यवहारात हे पृथक्करण त्या वेळी झालेले नव्हते. दुसरा एक 'आसेध' हा शब्द आपल्या धर्मशास्त्रग्रंथांत आढळतो. पण त्याचा अर्थ बराच स्थूल उर्फ भोंगळ असल्याचे दिसते. अलीकडच्या भाषेत बोलायचे तर आसेध म्हणजे समन्स, आसेध म्ह० वारंट, आसेध म्ह० अटक, आसेध म्ह० जप्ती! ही गोष्ट हेच दर्शविते की या सर्व शब्दांनी दर्शविलेल्या क्रियांचे सूक्ष्म पृथक्करण त्या काळात झालेले नव्हते. ज्या मनुष्याविरुद्ध काही तक्रार करण्यात आली असेल त्याला आपली बाजू पुढे मांडण्यास भाग पाडता येईल असा काही तरी इलाज करणे म्हणजे ङ्गआसेधङ्ख एवढी ढोबळ कल्पना त्या वेळी असावी असे दिसते.

इंग्रजी अंमल सुरू झाल्यानंतर इंग्रजांनी, विशेषतः प्रारंभींच्या काळात, देशी भाषांची वाढ पुष्कळ केली, यांत काही शंका नाही. त्यांनी आपली न्यायदानपद्धती इथे चालू केली, पण न्यायदान हे सामान्य जनतेकरिता असल्यामुळे न्यायाच्या व्यवहारात लागणारे शब्द त्यांनी इथेच तयार करवून घेऊन ते वापरात आणले. वरच्या परिच्छेदात आलेले शब्द, म्हणजे दिवाणी, फौजदारी, जप्ती, तसेच अदालत, वकील, हुकूमनामा, फिर्याद, दावा इ० शेकडो शब्द मुख्यतया इंग्रजी अमलाच्या प्रारंभीच्या काळातच आपल्या भाषेत दृढमूल होऊन गेलेले आहेत. न्यायदानाची सर्व परिभाषा, त्याचप्रमाणे जिल्ह्यापर्यंतच्या सरकारी कामकाजाची परिभाषा इंग्रज शासकांनी देशी भाषांसाठी तयार करविली. हें शब्दघडणीचे कार्य मुख्यतया बंगाल्यात झाले व तेथे तयार झालेली परिभाषा प्रांतभेदानुसार थोड्याफार फरकाने इतरत्र रूढ करण्यात आली. बंगाल्यात इंग्रजांचा अंमल सर्वात अगोदर सुरू झाला आणि तेथील पूर्वीचे राजे मुसलमान होते. साहजिकच इंग्रजांनी जी परिभाषा बनविली ती त्या काळी मुसलमानी राज्यांत प्रचलित असलेल्या फारसी शब्दसंग्रहावरून तयार करविली. पुढे जरुरीनुसार संस्कृत शब्दांचा समावेश त्यात करण्यात आला, पण एकंदरीने त्याचे प्रमाण थोडेच राहिले.





अनुक्रमणिका

या गोष्टी अर्थात इंग्रजांनी आपले राज्य चालविण्यास जरुरीच्या म्हणून केल्या. देशी भाषांचे संवर्धन होऊन त्यांचे सामर्थ्य वाढावे, हा त्यात हेतू नव्हता. पण हा हेतू ज्यात स्पष्ट दिसून येतो असेही अनेक प्रयत्न त्यांनी केले ही गोष्ट कृतज्ञतेने नमूद करून ठेवायला पाहिजे. ईस्ट इंडिया कंपनीचे धोरण खरोखरी प्रजानुरंजनाचे होते. देशी भाषांचे शक्य तितके सर्वांगपरिपूर्ण कोश कंपनीच्या डायरेक्टरांच्या प्रोत्साहनाने करविण्यात आले. सुमारे १८४८पर्यंत देशी भाषांतूनच शिक्षण देण्याचे धोरण डायरेक्टरांचे होते. तेव्हा सर्व विषयांची पुस्तके लिहिण्याचा प्रयत्न झाला व त्यासाठी शास्त्रीय परिभाषा देखील बनविण्यात आली. गणित, भूमिती, पदार्थविज्ञान, रसायन इ० विषयांत माध्यमिक शिक्षणापर्यंतची जी परिभाषा सध्या आपल्या भाषेत रूढ होऊन गेलेली आहे, तिचे मूळ शंभर वर्षांपूर्वी ई० इं० कंपनीच्या अमदानीत झालेल्या परिभाषानिर्मितीच्या प्रयत्नांत आहे हे आपण लक्षात ठेवले पाहिजे.

पुढे युनिवर्सिट्या ऊर्फ विद्यापीठे आली; पण देशी भाषांचा आश्रय तुटला. सरकारने निराश्रित केलेल्या देशी भाषांना विद्यापीठांमधून बाहेर पडलेल्या पदवीधर विद्वानांनी सनाथ केले. देशाभिमानाने प्रेरित झालेल्या अनेक मान्यवर पंडितांनी देशी भाषांचा कैपक्ष घेऊन चळवळी केल्या व विद्यापीठांच्या अभ्यासक्रमांत देशी भाषांना स्थान मिळवून दिले. अनेकांनी प्रौढ शास्त्रीय ग्रंथ निर्माण करून भाषेच्या शब्दसंपत्तीत भर घातली. अभ्यासविषय म्हणून देशी भाषांना स्थान मिळाल्यानंतर शिक्षणाचे माध्यम देशी भाषा असाव्या; ही मागणी सुरू झाली; आणि माध्यमिक शिक्षणापर्यंतचे माध्यम देशी भाषा या बहुतांशी बनल्या असून विद्यापीठीय शिक्षणाचे माध्यम होण्याच्या बेतात त्या आहेत, अशा दोन कालखंडांमधल्या उंबरठ्यावर आपण आज आहो. या अलीकडच्या काळात देशी भाषांसाठी शास्त्रीय परिभाषा बनविण्याचे वैयक्तिक व संघटित प्रयत्न अनेक झाले.

स्वातंत्र्य मिळाले; राज्यघटनेच्या कलमांनी हिंदी ही संघसरकारची भाषा ठरविली. हिंदी भाषेच्या अभिमान्यांचे घोडे गंगेत न्हाले. पण हिंदी भाषाभाषी लोकांखेरीज इतरांचे स्वभाषा राजमान्यतेच्या सिंहासनावर आरूढ झालेल्या पाहण्याचे मनोरथ बहुतांशी विरून गेले. शिक्षणक्षेत्रात प्रादेशिक भाषांनी माध्यम म्हणून जेवढे आक्रमण केले होते त्याच्या पुढच्या पायऱ्या चढणे बाजूसच राहो, त्यांचे पूर्वीचे स्थान तरी कायम राहते की नाही याचीही शंका वाटण्याजोगी परिस्थिती निर्माण झाली. प्रादेशिक भाषांना स्थान नाही, आणि हिंदीचा वापर करणे जमत नाही, तेव्हा परिणाम काय? इंग्रजीचा उपयोग स्वातंत्र्यपूर्वकालापेक्षाही अधिकाधिक होऊ लागणे, हा! भाषाभिमानाची पूर्वीची भावना विगलित झाली. इंग्रजीची प्रतिष्ठा कायमच राहिली-थोडीबहुत वाढली देखील!

निरनिराळ्या राज्यांच्या सरकारांनी याप्रमाणे आपापल्या भाषांचा राज्यकारभारात इंग्रजीच्या ऐवजी उपयोग करिता यावा या हेतूने काही ना काही योजना केल्या आहेत. पण

मुंबई राज्याच्या सरकारने याबाबत काही हालचाल केली असल्याचे ऐकिवात नाही. मुंबई राज्यात गुजराती व मराठी (आणि कानडी) या अत्यंत प्रगत भाषा आहेत. या दोघींच्या (व कानडीच्याही) शब्दसंपत्तीत आणि रूढ झालेल्या परिभाषेत फार मोठी एकरूपता आहे. राज्यकारभारात, न्यायदानात, विद्यापीठात या भाषा सुरू करण्यासाठी जरूर ती परिभाषा निश्चित करणे ही मोठी कठीण गोष्ट नाही. तथापि या आपल्या जनतेच्या पुढारलेल्या भाषा सोडून मुंबई सरकारने हिंदीची सर्वत्र योजना करण्याचे मनात आणले आहे असे ऐकिवात आहे.

निरनिराळ्या राज्यसरकारांनी आणि केंद्र सरकारच्या निरनिराळ्या खात्यांनी हिंदीकरणाचा जमाना सुरू करण्यासाठी जे प्रयत्न चालविले आहेत, त्यामुळे सामान्य मनुष्य भांबावून जाईल.

व्यवसायात्मिका बुद्धिरेकेह कुरुनंदन ।
बहुशाखा ह्यनंताश्च बुद्धयोऽव्यवसायिनाम् ।।

या वचनाची प्रचीती येथे येईल. जे अध्यात्मात तेच व्यवहारात. व्यवसायात्मिका बुद्धि दोन्ही ठिकाणी पाहिजे. 'तदेकं वद निश्चित्य' असेच सामान्य मनुष्य म्हणणार!

ही व्यवसायात्मिका बुद्धि कोणच्या प्रकारची असावी? म्हणजे हिंदीमध्ये (अर्थात कोणच्याही भारतीय भाषेमध्ये) परिभाषा निर्मितीचे काम कोणच्या तत्त्वांनुसार चालावे? या कामाचा उद्देश कोणता व तो उद्देश कोणत्या पद्धतीने आणि धोरणाने सिद्धीस जाईल?

उद्देश सूत्ररूपाने सहज सांगता येईल. जनतेमधील ज्या वर्गाच्या उपयोगाकरिता परिभाषा बनवावयाची असेल त्याला ती समजावयाला शक्य तितकी सोपी जावी, त्याला समरसतेने ग्रहण करता येऊन त्याच्या मानसिक विकासाला साधनीभूत व्हावी, हाच उद्देश परिभाषानिर्मितीच्या कार्याचा असू शकतो. याखेरीज दुसरा उद्देश संभवत नाही. ज्याच्या पायाकरिता जोडा शिवायचा, त्याच्या पायाला उत्तम रीतीने बसेल, त्याला सुखकारक वाटेल अशा रीतीनेच तो शिवायला पाहिजे. फॅशनच्या किंवा दुसऱ्या काही मन:पूत कल्पनांच्या आहारी जाऊन आपण जर जोड्याचा आकार ठरवू लागलो आणि तो जर घालणाराला बोचू लागला तर आपली कारागिरी विफल झाली असेच समजायला पाहिजे.

अर्थात बनवला जाणारा प्रत्येक शब्द धातू व रूपसिद्धी किंवा रूढी यांच्या योगाने नियोजित अर्थ बरोबर व्यक्त करणारा असावा ही तर मूलभूत आवश्यकता होय. या दृष्टीने योग्य शब्द असतील त्यांत निवड करावयाची ती वर वर्णिलेल्या उद्देशानुसार करण्यात आली पाहिजे. म्हणजे ज्या वर्गाच्या उपयोगाकरिता तो शब्द असेल त्या वर्गाच्या समजुतीत स्वाभाविक रीतीने चपखल बसेल अशा धोरणाने शब्दाची निवड व्हावी.

आपल्याला जी परिभाषा बनवावयाची आहे, तिचे वरील उद्देशानुसार ढोबळ मानाने





अनुक्रमणिका

वर्गीकरण करता येईल.

१. सरकारच्या सर्व खात्यांचे व्यवहार, त्यांना लागणारे नियम, सरनामे, पत्रके इ०

२. कायदा व कोर्टाचे सर्व व्यवहार; न्यायदानपद्धतीत अंतर्भूत होणाऱ्या सर्व बाबी, कोर्टाच्या नोटिसा, फिर्यादी, कैफियती, वकिलांचे युक्तिवाद इ०

३. राजकारण, सार्वजनिक संस्थांचे व्यवहार, सभा-संमेलने इ०

४. शिक्षणाचे क्षेत्र. मूलभूत शास्त्रे. विद्या व कला (माध्यमिक शिक्षणापर्यंतची मर्यादा)

५. मानवीय आणि सामाजिक शास्त्रांचा उच्च शिक्षणात अंतर्भूत होणारा अंश.

६. भौतिक शास्त्रे, उच्च शिक्षणात अंतर्भूत होणारा अंश. तांत्रिक (टेक्निकल) विद्या व कला यांची उच्च पातळी.

हे वर्ग अर्थात स्थूल मानाने केलेले आहेत. यांपैकी प्रत्येक वर्गाची परिभाषा वर वर्णिलेल्या उद्देशाच्या सिद्ध्यर्थ कोणत्या धोरणानुसार बनविली जावी याचा थोडक्यात निर्देश येथे करू.

हे करण्यापूर्वी एक महत्त्वाचा इशारा देणे जरूर वाटते. वर नमूद केलेल्या सहाही वर्गांमध्ये समाविष्ट होतील अशा पुष्कळशा संज्ञा यापूर्वीच तयार झालेल्या असून त्या भाषेत रूढही झालेल्या आढळतील. पुष्कळसे शब्द मागे वर्णिल्याप्रमाणे सरकारने उपयोजून रूढ केले; कित्येक लोकांनी आपल्या कल्पनेने वापरात आणले; अनेक विद्वानांनी व्यक्तिशः व अनेक संस्थांनी संघशः परिभाषानिर्मितीचे प्रयत्न करून आपले पारिभाषिक कोश प्रसिद्ध केले. हे सर्व प्रयत्न जमेस धरून, रूढ झालेल्या व होऊ पाहणाऱ्या व शकणाऱ्या सर्व शब्दांचे आपुलकीने स्वागत करून मगच त्या पायावर नवीन परिभाषानिर्मितीची इमारत बांधली पाहिजे. सर्व समाजाची खर्ची पडलेली ही शक्ती वाया घालविता उपयोगी नाही.

पूर्वी झालेले प्रयत्न जमेस धरून पुढचे प्रयत्न केले पाहिजेत. हे सांगण्याची जरूरी काय? ही स्वाभाविक, क्रमप्राप्त गोष्ट आहे, असे कोणासही वाटेल पण ही गोष्ट देखील बजावायला पाहिजे अशी दुर्दैवाने आज परिस्थिती आहे. परिभाषेच्या काही कारखानदारांनी अशी भुरळ उत्पन्न केलेली आहे की पूर्वी झालेले सर्व प्रयत्न निरुपयोगी व अशास्त्रीय होते. परिभाषानिर्मितीची गुरुकिल्ली त्यांना गवसलेली नव्हती. आम्ही आपल्या प्रतिभाबलाने ही गुरुकिल्ली साध्य करून घेतलेली आहे. तेव्हा आम्ही देतो तेच शब्द वापरा. पूर्वीचे रूढ शब्द किंवा इतरांनी सुचविलेले शब्द वापराल तर अधोगतीला जाल! Physics ला पदार्थविज्ञान म्हणू नका; भौतिकी म्हणा; Geometryला भूमिती म्हणणे खुळेपणाचे आहे, त्याला रेखिकी म्हणा; Suitला दावा म्हणणे अब्रह्मण्यम्, त्याला व्यवहारवाद म्हणा; absconderला फरारी म्हणणे चुकीचे, त्याला अपपलायक, अगर अपगोप्ता असेच म्हणा; appealला अपील म्हणणे हा भ्रष्टाकार, त्याला पुनर्विचार-प्रार्थना असे म्हणणे हेच योग्य. असा हा आग्रह प्रचारकी कौशल्याच्या पाठिंब्याने, एकसारखा चालू आहे आणि त्याने मोठमोठ्यांना

भुरळ पाडली आहे. म्हणूनच पूर्वजांचे ठेवणे जमेस धरा, असा इशारा देणे जरूर वाटले.

हा सिद्धान्त मान्य केल्यानंतर ज्या इंग्रजी संज्ञांना अगर शब्दप्रयोगांना बरोबर अर्थाचे प्रतिशब्द पूर्वीच रूढ झालेले अगर सुचविलेले नसतील, त्यांच्याकरिता नवीन परिभाषा तयार करणे झाल्यास वर दर्शविलेल्या भिन्नभिन्न वर्गांच्या बाबतीत सर्वसाधारणत: कोणचे धोरण अंगीकारावे याचा विचार करू.

वर्ग १ व २ यांच्या बाबतीत दोन-तीन धोरणे राखली पाहिजेत. पहिले व प्रमुख धोरण हे की या या दोन्ही वर्गांची परिभाषा सर्वसामान्य जनतेला समजेल अशी सुलभ, सुटसुटीत व व्यवहार्य असली पाहिजे. कारण कायदा, न्यायव्यवहार आणि सरकारी कारभार यांचा सर्व जनतेशी संबंध येतो. प्रत्येक इंग्रजी शब्दाबद्दल निरनिराळ्या देशी भाषांमध्ये कोणते पर्यायशब्द प्रचलित आहेत व होते, आजपर्यंतच्या सरकारी ट्रान्सलेटरांनी, कायद्याच्या भाषांतरकारांनी कोणते शब्द वापरले, मध्यभारतासारख्या प्रांतांत परवापर्यंत हायकोर्टाचे निकाल देखील देशी भाषांमध्ये होत असत, तेथे इंग्रजी संज्ञांना कोणते प्रतिशब्द वापरीत असत, इत्यादी गोष्टींचे नीट संशोधन झाले पाहिजे. जरूर तेथे स्थानिक तलास (फील्ड वर्क) झाला पाहिजे. आणि या सर्व प्रयत्नांनी जमलेल्या सामग्रीच्या आधारावर शब्दनिश्चिती झाली पाहिजे.

या वर्गांतील शब्दांच्या बाबतीत बिनचूकपणा व अर्थनिश्चिती यांना अत्यंत महत्त्व दिले जावे. एका इंग्रजी शब्दाला सहसा एकच प्रतिशब्द निश्चित करण्यात यावा. जेथे एकाच शब्दाचे दोन अथवा अधिक अर्थ परस्परांहून बरेच भिन्न असतील तेथे त्या अर्थांस अनुसरून भिन्न प्रतिशब्द निश्चित केले जावेत. उदा० कम्युनिकेशन याला संचार व निवेदन असे दोन प्रतिशब्द योजणे भाग पडते; असेशन याचे दोन अर्थ (१) एका राजाने दुसऱ्या राज्यात सामील होणे व (२) संपत्तीत वाढ होणे; या दोन अर्थी दोन निरनिराळे प्रतिशब्द योजावे लागतील. जे प्रतिशब्द योजावयाचे त्यांपासून साधित शब्द बनविण्याची सुलभता असावी. मात्र ही बाब आवश्यक नाही. साधित शब्द निराळ्या धातूपासून निराळ्या रीतीने बनविले तरी चालतील. सुलभता आणि निश्चितार्थकता ही दोन धोरणे मुख्य. ती साधली म्हणजे झाले.

वर्ग ३. या वर्गात निश्चितार्थकता आणि एका अर्थी एकच प्रतिशब्द ही धोरणे इतक्या कसोशीने पाळली गेली नाहीत तरी चालतील. जोंपर्यंत लोकांच्या समजुतीत बिघाड येत नाही तोपर्यंत एका शब्दाला अनेक प्रतिशब्द झाले तरी चालतील.

सेक्रेटरी याला सेक्रेटरी, चिटणीस, कार्यवाह, मंत्री असे अनेक शब्द रूढ आहेत; लीडरला आपण पुढारी म्हणतो, नेताही म्हणतों; संघ, मंडळ, परिषद, संमेलन हे शब्द ढोबळ मानाने एकाच अर्थी उपयोजिले जातात. होता होईल तो एक कल्पना एकाच शब्दाने द्योतित व्हावी हे उत्तम. पण फार कडक निर्बंधने व्यवहारसौकर्यास बाधक होतील.





अनुक्रमणिका

वर्ग ४. माध्यमिक दर्जापर्यंतच्या शिक्षण क्षेत्रात प्रत्येक भाषेमध्ये प्रत्येक विषयाचे प्रतिशब्द यापूर्वी प्रतिष्ठित झालेलेच आहेत. ते शब्द काढून टाकून नवीन शब्द रूढ करण्याचा प्रयत्न घातक होईल. भारतीय ऐक्याच्या नावाखाली निरनिराळ्या भाषांनी आपआपल्या परंपरेनुसार कमावलेली शब्दसंपत्ती नष्ट करण्याचा प्रयत्न झाल्यास शिक्षण क्षेत्रात ते एक मोठे अरिष्ट उद्भवल्याप्रमाणे होईल. मराठी दुसऱ्या तिसऱ्या यत्तेत बेरीज, वजाबाकी यांऐवजी योग, वियोग हे शब्द वापरा म्हणून सक्ती (किंवा आग्रह म्हणा पाहिजे तर) कोणी केल्यास ते मराठी जनतेस खपेल काय? पण असा प्रयत्न होऊ घातला आहे, हे लोकांनी लक्षात घ्यावे.

हा इशारा खरोखरी वर्ग १ व २ यांतील शब्दांना सुद्धा लागू आहे. भारतीय ऐक्याच्या नावाखाली गेल्या दीडशे वर्षांची निरनिराळ्या भाषांची निरनिराळी परंपरा पुसून टाकून एकच शब्दपद्धती कोर्टकचेऱ्यांत व सरकारी व्यवहारांत सर्वांनी स्वीकारावी असे म्हणणे जितके अयुक्तिसिद्ध तितकेच अशक्य आहे. इंग्रजी संज्ञांना निरनिराळ्या भाषांमध्ये निरनिराळे प्रतिशब्द असले तरी काहीच बिघडणार नाही. सर्व भाषांतील प्रतिशब्द बिनचूक रीतीने देणारे कोश असले म्हणजे झाले. अक्युज्डला एका भाषेत मुलजिम म्हटले, दुसऱ्या भाषेत आरोपी म्हटले व तिसरीत अभियुक्त म्हटले तरी त्यात नुकसान काहीच नाही. उलट त्या त्या भाषेच्या लोकांना समजण्याची सुलभता झाली हा फार मोठा फायदा आहे.

वर्ग ५. या वर्गात पूर्वी रूढ झालेले वा सुचविले गेलेले शब्द सोडून बाकीचे शब्द होताहोईतो संस्कृत धातूंपासून व्याकरणशुद्ध रीतीने बनविण्यात यावे. अर्थात हे शब्द शक्यतो सर्व भारताकरिता एकच असावेत, ही दृष्टी जरूर ठेवावी. वेदकालापासूनच्या जुन्या धार्मिक, तात्त्विक, शास्त्रीय, व कलाविषयक वाङ्मयातील संज्ञांचा शक्यतो उद्धार करण्यात यावा. सुलभतेची दृष्टी सोडू नये. पण या वर्गातील परिभाषा उच्च शिक्षितांकरिता आहे हे लक्षात ठेवून अर्थाची सूक्ष्मता व बिनचूकपणा यांना प्राधान्य देण्यात यावे.

वर्ग ६. भौतिक शास्त्रांच्या उच्च स्तरांतील संज्ञा इंग्रजीच्या द्वारा आपल्याकडील उच्च विद्यालयीन शिक्षणात ज्या रूढ झाल्या आहेत व शिक्षक व शिक्षित यांच्या मनांत दीर्घ परिचयामुळे मुरून गेल्या आहेत, त्याच स्वीकारणे एकंदरीने इष्ट होईल. केंद्रीय शिक्षणखात्याच्या शास्त्रीय परिभाषामंडळाने आंतरराष्ट्रीय संज्ञा स्वीकारण्यात याव्या असाच ठराव केला आहे; आणि उच्च शिक्षणाच्या क्षेत्रात भौतिक शास्त्रात तोच उपयुक्त ठरेल. रासायनिक द्रव्ये व रासायनिक संयोग, प्राणिशास्त्र व वनस्पतिशास्त्र यांतील असंख्य प्राणिजाति व वनस्पतिजाती यांची नावे, इत्यादी अनेकानेक गोष्टींचे संस्कृतीकरण करू जाणे हा वृथा प्रयास ठरेल. आणि त्यात फायदा कोणताही नाही. ज्या वस्तूला युरेनियम ऑक्साईड म्हणायचे त्याला किरणातुजारेय म्हटले तर त्यात अर्थव्यक्तीच्या दृष्टीने कोणता फायदा

झाला? युरेनियम ऑक्साईड ही संज्ञा त्या क्षेत्रात पूर्वीपासून प्रचलित तरी आहे.

तांत्रिक विद्या व कला यांचे शब्द त्या त्या तंत्रांच्या तज्ज्ञांकडे, प्रत्यक्ष कारखान्यांत अगर वर्कशॉपमध्ये काम करणाऱ्यांकडे जाऊन जमा केले पाहिजेत. त्यांच्या वापरात असलेले शब्द ही जिवंत परिभाषा होय. असे सर्व विद्या व कला यांच्या कारागिरांच्यामध्ये जाऊन मिसळून केलेले फील्ड वर्क (स्थानिक तलास) हेच या वर्गातली पुष्कळशी परिभाषा आपल्याला देण्यास समर्थ होईल.

याप्रमाणे वर्गीकरणाच्या आधारावर सर्वोपयोगी परिभाषा कशी निर्माण करता येईल याविषयीच्या अनेक वर्षांच्या विचाराने आणि अनुभवाने बनलेल्या कल्पना निवेदन केल्या. सर्व ठिकाणी व सर्व बाजूंनी संशोधन करून, जमलेल्या सामग्रीचा तारतम्याने विचार करून, ज्या वर्गासाठी आपण हे शब्द निर्माण करणार त्याची समज, परंपरा लक्षात घेऊन, शब्दनिश्चिती करण्यात यावी व अपरिहार्य तेथेच नवीन शब्द बनविण्यात यावेत. यात कोणत्याही प्रकारचा आग्रह नसावा. आणि कोणाच्याही मक्तेदारीला प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष प्रोत्साहन मिळू नये. मक्तेदारी मूळ धरू लागली म्हणजे आग्रह निर्माण होतो. मक्तेदारी जगवण्यासाठी मोठ्या तत्त्वाचे खोटे आभास निर्माण केले जातात आणि संस्कृतिरक्षणासारख्या उदात्त तत्त्वांची भुरळ पाडण्यात येते. मनात एक, वाणीत दुसरे, तर कृतीत तिसरेच असा लपंडाव सुरू होतो. सत्ताधारी लोक या प्रचाराच्या जाळ्यात सापडले म्हणजे मक्तेदारी निर्वेध होते. आरबी-फारसी विरुद्ध संस्कृत हा वाद वृथा आहे. वास्तव जगतात त्याला स्थान नाही.

परवा ता० ३० मे रोजी संसदीय हिंदी परिषदेचे उद्घाटन करताना श्री० जवाहरलाल नेहरू यांनी जे फार सुंदर भाषण केले त्याच्याशी स्वत:चे विचार तंतोतंत जुळत असल्याचे पाहून प्रस्तुत लेखकास आनंद वाटला. ''भाषा हे समाजाचे जिवंत माध्यम आहे. समाजाची ताकद वाढविणारे, जनतेच्या मनात चैतन्य ओतून त्याला विकसित व स्वतंत्र करणारे असे भाषेचे स्वरूप असले पाहिजे. जी भाषा सामान्य जनांना समजू शकत नाही, जिच्याशी जनता समरस होऊ शकत नाही अशी भाषा समाजाची ताकद कशी वाढविणार? भाषेने जनतेचे मानसिक सामर्थ्य वाढविले पाहिजे, तसेच जनतेच्या चैतन्यामुळे भाषेची ताकद वाढली पाहिजे. भाषा ही सुंदर अलंकारपूर्ण कृती निर्माण करणाऱ्या मूठभर विद्वानांची किंवा साहित्यकारांची नाही. ती जनतेची आहे. तिच्या चैतन्याची व वाढीची मुळे जनतेच्या अंत:करणांत खोल गेलेली आहेत.''

[महाराष्ट्र साहित्य पत्रिका, एप्रिल-मे-जून १९५२,
(पृ० ११-२१) मधील लेख संपादित स्वरूपात साभार.]

■

# महाजालावरचा मराठी विश्वकोश

विजय पाध्ये

मराठी विश्वकोशाचे आजवर प्रसिद्ध झालेले सर्व खंड आता प्रत्येक महिन्यास एक ह्याप्रमाणे संकेतस्थळावर युनिकोड रूपात लवकरच उपलब्ध करून देण्यात येणार आहेत, अशी सुखद बातमी वर्तमानपत्रे, आकाशवाणी, प्रकाशवाणी वगैरे माध्यमांद्वारे आमच्यापर्यंत येत होती. परंतु हे महत्त्वाकांक्षी व आव्हानात्मक असलेले काम प्रत्यक्षात महाजालावर प्रकट झालेले केव्हा पाहायला मिळेल ह्याची जी उत्कंठा लागून राहिली होती, ती अलीकडेच पहिल्या खंडांची काही पाने www.marathivishvakosh.in ह्या संकेतस्थळावर पाहायला मिळाल्यावर अंशतः शमली ह्याचे समाधान झाले.

मात्र एकूण सरकारी कामाविषयीचा आजवरचा अनुभव लक्षात घेता हे समाधान व आनंद क्षणभंगुरच (संकेतस्थळावरील नोंदीनुसार 'क्षणभंगूर'!) ठरणार की काय अशी भीती होती आणि ती खरी ठरली. डॉ० विजया वाड ह्यांच्यासारख्या साक्षेपी, अनुभवी, उत्साही प्रकल्प-संचालक आणि माधव शिरवळकर ह्यांच्यासारख्या संगणकक्षेत्रातील तज्ज्ञ (संकेतस्थळावरील नोंदीनुसार 'तज्ञ'!) व्यक्तींच्या मार्गदर्शनाखाली अवतरलेला मजकूर जाणकार मुद्रितशोधकाच्या सेवेखेरीज वा त्या सेवेचे महत्त्व अव्हेरून संकेतस्थळावर चढवण्यात (अपलोड) आल्याचे आढळून येते. वर दोन नोंदींचा वानगीदाखल उल्लेख केला आहेच, शिवाय ना०गो० कालेलकरऐवजी ना०गो० कालेककर, सूत्रेऐवजी सुत्रे, तत्संबद्धऐवजी तत्तसंबद्ध, विश्वकोशऐवजी विश्लकोश, गुरुत्वाकर्षणऐवजी गुरूत्वाकर्षण, आइसलँड ह्या देशनामापुढे देवनागरीत लिप्यंतर करून टाकलेली लीद्वेल्दिदि ईस्लांत अशी उच्चारण्यास अवघड व सदोष नोंद वगैरे मजकूर पाहिल्यास मुद्रितशोधकाने आपले काम काळजीपूर्वक केलेले नसल्याचे किंवा काम नीट केलेले असले तरी पुढील प्रक्रियेत मुद्रितशोधकाने केलेल्या सूचनांकडे लक्ष देण्यात हलगर्जीपणा झाल्याचे सहज लक्षात येते. सुरुवातीच्याच काही पानांमधील मजकुराबाबतचे हे निरीक्षण आहे; पुढील पानांत काय वाढून ठेवलेले असेल त्याची कल्पना केलेली बरी!

कोणताही कोशग्रंथ हा अभ्यासकाच्या दृष्टीने उत्तम संदर्भस्रोत मानला जात असल्याने मराठी विश्वकोशाचे टंकन निर्दोष असणे अपेक्षित होते. केवळ त्वरेने काम उरकणे हेच उद्दिष्ट न ठेवता कामाचा दर्जा उत्तम राखून वापरकर्त्याच्या अपेक्षांची पूर्तता झाली पाहिजे हेही उद्दिष्ट असणे आवश्यक आहे. तेव्हा, आतापर्यंत प्रकट झालेल्या सर्व

मजकुराचे जागरूकतेने व काळजीपूर्वक वाचन केले जावे आणि आवश्यक ती दुरुस्ती त्वरेने केली जावी अशी सूचना करावीशी वाटते.

ह्या संदर्भात 'अंतर्नाद'च्या दिवाळी २०११ अंकात प्रसिद्ध झालेले श्री० दिनकर गांगल ह्यांच्या 'फुटीर, अस्वस्थ महाराष्ट्र' ह्या लेखातील निरीक्षण लक्षवेधी आहे. सदर विश्वकोशाच्या रचनेत महाराष्ट्राला फारसे स्थान नाही; कोशात श्रीलंकेतील अनुराधापूरचा समावेश आहे, परंतु महाराष्ट्रातील श्रीवर्धन-दिवेआगर ह्यांसारख्या इतिहासप्रसिद्ध गावांना अथवा धुरूंसारख्या दानशूर माणसांना स्थान नाही, असे त्यांनी म्हटले आहे. अशा प्रकारच्या अनेक त्रुटी असतील, त्याही दूर करून उपलब्ध कोशातील सामग्री अद्ययावत करणे, नवीन विषय, नवीन माहितीचा समावेश करणे, तो वरचेवर अद्ययावत करीत राहणे हेदेखील महत्त्वाचे कार्य दुर्लक्षून चालणार नाही. तेही एकाच वेळी हाती घेणे आवश्यक आहे. त्यासाठी जसे कोशकार्याशी निगडित अशा तज्ज्ञांचे सातत्याने मार्गदर्शन व साहाय्य घ्यावे लागेल, तसेच मुद्रितशोधनासारख्या अत्यावश्यक प्रक्रियेतील जाणकारांची सेवा घ्यावी लागेल आणि संगणकविज्ञान, माहितीशास्त्र, महाजाल वगैरे क्षेत्रांतील तज्ज्ञांचे व दुय्यम कर्मचाऱ्यांचेही साहाय्य सातत्याने घ्यावे लागेल.

कोशातील माहिती निर्दोष व सातत्याने वरचेवर अद्ययावत केली जाणारी असली तर मराठी विश्वकोशाला संकेतस्थळावर स्थान मिळाल्याबद्दलचे खरे समाधान जिज्ञासू अभ्यासकांना लाभेल. नाहीतर शासनाकडून पुरविल्या जाणाऱ्या पैशाचा विनियोग न्याय्य रीतीने केला जात नसल्याची त्याला खंत वाटत राहील. ■

## नर्सेसची रंगरंगोटी?

मुंबई महानगरपालिकेत मराठी विभाग ४० वर्षांपूर्वी स्थापन करण्यात आला. मराठीचा व्यवस्थित वापर कसा करण्यात यावा याबद्दल त्याआधी कोणतीही सुसूत्रता नव्हती. त्यातून घडलेले हे काही गमतीदार किस्से...

एकदा 'टेंडर्स आर इन्व्हायटेड फॉर पेंटिंग नर्सेस क्वार्टर्स', याचे 'परिचारिकांचा एक चतुर्थांश भाग रंगविण्यासाठी निविदा मागविल्या आहेत' असे मराठी भाषांतर पालिकेच्या स्थापत्य विभागाने करून ते मराठी वृत्तपत्रांत प्रसिद्ध केले होते. त्यावेळी कै० अप्पा पेंडसे हे हुषार व मिश्कील नगरसेवक होते. त्यांनी महापालिकेच्या सभेत ती जाहिरात वाचून दाखविली व हरकतीचा मुद्दा उपस्थित केला. परिचारिकांच्या रंगरंगोटीची व्यवस्था महापालिका केव्हापासून पाहू लागली, असा गमतीशीर मुद्दा त्यांनी मांडला असता आयुक्तांनी त्यावर खुलासा करून माफी मागितली. यापुढे मराठी विभाग स्थापन करून भाषांतराची योग्य ती काळजी घेण्यात येईल, असेही त्यांनी स्पष्ट केले. त्यावर ते म्हणाले, ''बहुदा क्वार्टर घेऊन भाषांतर केले असावे.'' या वाक्याने सभागृहात हशा पिकला.

ग०भा० मराठे, घाटकोपर (पूर्व)

(दै०महाराष्ट्र टाइम्स, दि० २० एप्रिल २००५)

# तरुणाईच्या भाषेमधील काव्यसंग्रह

हेमंत गोविंद जोगळेकर

[ परीक्षित पुस्तके : (१) 'सलील वाघ - निवडक कविता' संकलन : जयंत गाडगीळ. टाईम ॲण्ड स्पेस कम्युनिकेशन्स. पुणे. १९९६. पृष्ठे ८-१२०. किंमत ₹ ८५/-. (२) 'सध्याच्या कविता'. सलील वाघ. टाईम ॲण्ड स्पेस कम्युनिकेशन्स. पुणे. २००५. पृष्ठे ६+८६. किंमत ₹ १००/- (३) 'थांबताच येत नाही' - हेमंत दिवटे. अभिधानंतर प्रकाशन. मुंबई. २००६. पृ० ७०. किंमत ₹ १००/- ]

साधारणतः १९९०नंतर लिहू लागलेल्या आणि स्वत:ला नव्वदोत्तर म्हणविणाऱ्या कवींच्या कवितांमध्ये काही सारखेपणा आढळतो. या कविता जागतिकीकरण, उदारीकरणाविषयी बोलतात. त्यांची भाषा हिंदी इंग्रजीमिश्रित आणि संगणकीय असते. ही भाषा आजच्या तरुणाईची भाषा बनलेली आहे. कवितेतील अनुभव आणि अभिव्यक्ती अशी एकारलेली होत असताना काही कवी त्यावर आपले वेगळेपण कोरत असतात. अशा दोन कवींच्या संग्रहांची दखल येथे घेत आहे.

सलील वाघ यांचा पहिला कवितासंग्रह 'सलील वाघ : निवडक कविता'. हा संग्रह १९९६ साली जयंत गाडगीळांनी संकलित केला. त्यातील पहिल्याच कवितेत, 'डोन्ट ट्राय टू रीड धिस ऑर मेक अ सेन्स ऑफ इट धिस इज अ डमी कॉपी' हा मजकूर पुन्हा पुन्हा एखाद्या देवळाच्या आकारात मांडलेला आहे. वाचकांना या कवितेच्या वाटेला न जाण्याचा जणू वैधानिक इशाराच कवी बाह्यत: देत असला तरी त्याच्या कविता जीवनानुभवाचा 'सेन्स' पकडण्याची तर्ककठोर धडपड करीत आहेत. त्यातील अनुभवात प्रेम आहे, प्रेमभंग आहे, बालपणाचे स्मरणरंजन आहे, व्यवसायविश्वातील प्रवेश आहे. सामाजिक सांस्कृतिक साहित्यिक पर्यावरण आहे. प्रेमात पडल्यावर सलील वाघांच्या कवितेच्या निवेदकाची

''जगात फक्त तूच आणखी कुणी नाही''

अशी अवस्था होते. पण प्रेमाला प्रतिसाद मिळाला नाही तरी तो फार समजूतदारपणाने

''फार प्रेमानी पोसलाय प्रेमाचा वृक्ष
त्याला आता कुठे मधुर दु:खाची

फळं लहडतायत

त्याची गोडी नासवू नकोस माझ्या दु:खाची लय''

अशी भूमिका घेतो.

प्रेमानुभव व्यक्त करताना असे हळुवार होणारे सलील वाघ सामाजिक सांस्कृतिक ढोंगबाजीचा पर्दाफाश करताना कठोर औपरोधिक होतात.

''काहीतरी वलयप्रदाचं

शेपूट धरलं पायजे उदाहरणार्थ

तुकाराम भक्ती देशीयता सामाजिक बांधिलकी

पर्यावरण राष्ट्रवाद कळवळा चळवळी कोणत्याही

जागतिक बाजारपेठेचा अंदाज पायजे''

सलील वाघांच्या कवितेत स्थळाला फार महत्त्व आहे. तिथे स्थळ प्रतिमांची जागा घेते. मग 'आपटे रोड' हा नुसता रस्ता राहात नाही. कान्हाटीपासून शारजापर्यंत स्थळांच्या उल्लेखाशिवाय त्यांच्या कवितेला पूर्णता येत नाही.

सलील वाघांचा दुसरा कवितासंग्रह आहे 'सध्याच्या कविता'. या संग्रहातील अनुभव कार्पोरेट जगातले आहेत आणि त्यांनी कवितेच्या निवेदकाला कडवट बनवले आहे. या संग्रहात 'कंपनीतल्या कवितांची' मालिका आहे. ती दिलीप पुरुषोत्तमांच्या 'मॅजिक मुहल्ला'ची आठवण करून देते. अरुण कोलटकरांच्या जेजुरीची आठवण जागवणाऱ्या नरसोबाच्या वाडीच्या कविताही यात आहेत. दिल्लीच्या, मुंबईच्या, बंगळुरुच्या कविता आहेत. त्यात धावपळ आहे, दगदग आहे, पैसा आहे, उपभोग आहे; पण समाधान नाही. निवेदकाच्या स्वप्नात त्याच्या गावाकडच्या आख्ख्या गावाला पाणी पाजणाऱ्या बावडीतले तळकासव आहे. आणि आता खंत आहे की

''पैसा आला नी गेला

पायाशी फेसाळून

ना कधी पाय ओले झाले ना कधी हात ओले झाले''

कंपनीतल्या जिवाला जीव देणाऱ्या कामगारांना देशोधडीला लावल्याची अपराध भावना आहे. समोर उभे ठाकणारे मोह पेच घालताहेत-

''सगळी शरीरं खवळलीयत

साक्षात ब्रह्मकमळ

माझ्यापुढ्यात उमलून ठाकलं आहे

ते तुडवून पुढे जाईन

तर शाप लागेल

ते खुडून हातात घेईन

तर पाप लागेल
खुदा खैर करे !

सलील वाघांच्या कवितेत असे उर्दू, हिंदी, इंग्रजी, संस्कृत, कानडी शब्दसुद्धा सहज येतात. पण तिने तिचे मराठीपण लोपत नाही. पाहा :

''लाहीलाही डाउनलोड होईल
तिच्या विषाचा वडवानळ शरीरभर''

सलील वाघ हे तत्त्वज्ञानाचे विद्यार्थी आहेत. ते अनुभवाची नुसती नोंद करीत नाहीत. त्याचा तत्त्वभेद करू पाहतात. त्यासाठी भाषेला संकेतमुक्त-संकेतबद्ध करायला हवे असा त्यांचा विचार आहे. (त्यांचे काव्यविषयक विचार जसे त्यांच्या भूमिकेत नोंदवलेले आहेत तसेच त्यांच्या 'ब्लॉग पहिला' या पुस्तकात संग्रहित झालेले आहेत.)

सलील वाघांचे समकालीन कवी हेमंत दिवटे यांचा संग्रह आहे : 'थांबताच येत नाही'. हेमंत दिवटेही याच कालखंडात आणि पर्यावरण कविता लिहीत आहेत. त्यांच्या कवितांचे अनुभवद्रव्य तेच आहे आणि त्यांचा भर ते सगळे अनुभव कवितांतून आणण्यावर आहे. त्यांच्या कवितेचा निवेदक तो शामळू मुलगा आहे जो आईची आठवण अनावर झाल्यावर बोऱ्याबिस्तरा घेऊन पळून आला होता. आज या निवेदकाला स्वत:ला मुलगा झाला आहे, त्याच्या मनात एक काल्पनिक मित्र 'मोहक' आहे. निवेदक म्हणतो-

''एक मोहक
माझ्याही मनात
आणि मीही त्याची
मुलाचं मन होऊन
कधीचा वाट पाहतोय.''

हेमंत दिवट्यांच्या निवेदकाचे हे निरागस मूलपण त्यांच्या कवितेला मोहक बनविते. हा निवेदक मेगामॉलमध्ये शॉप करताना अतिमायक्रो विचार करतोय, सातासमुद्रापारच्या मित्राबरोबर चॅट करतोय, हप्ते भरतोय, ब्रँडदेवाची महाआरती करतोय, बायकोबरोबर सीरियसली नवरा-नवरी खेळतोय.

''थोडेफार आहेत इमेजचे ताण
तरीही बिचकत बिचकत जगतोय छान.''

पण मल्टीकल्चरल जगताना त्यांनाही खंत आहेच.

हेमंत दिवटे जी यातायात करीत आहेत ती मनातली कविता 'सेव' करण्याची असते - अनुभवामागचे तत्त्व शोधून काढण्याची नसते! त्यासाठी सगळेच अनुभव त्यांना कवितेत नोंदवून ठेवावेसे वाटतात. त्यांना थांबताच येत नाही. पण कवीने थांबायचेच कशाला? ■

# महाबँक पुरस्कार : अभिनंदन

मराठी अभ्यास परिषद व बँक ऑफ महाराष्ट्र यांच्या संयुक्त विद्यमाने उत्कृष्ट भाषाविषयक लेखनासाठी दिला जाणारा वर्ष २०११चा महाबँक पुरस्कार **माधुरी पुरंदरे** यांच्या **'लिहावे नेटके'**(ज्योत्स्ना प्रकाशन, पुणे, २०१०) या पुस्तकाला देण्यात येणार आहे. निवडसमितीत डॉ० प्रमोद तलगेरी, डॉ० विनायक गंधे व विजया चौधरी (निमंत्रक) यांनी काम पाहिले. हा पुरस्कार दि० २१ जानेवारी २०१२ला शिक्षणतज्ज्ञ रमेश पानसे यांच्या हस्ते धन्वंतरी सभागृह, पुणे येथे समारंभपूर्वक देण्यात येईल.

# देणगी

प्रा० लछमण हर्दवाणी यांनी मराठी अभ्यास परिषदेला ₹ ५००/- ची देणगी दिली आहे. संस्था त्याबद्दल कृतज्ञ आहे.

■

## अभिप्रायार्थ आलेली पुस्तके

(१) 'गणितातील रम्य प्रमाण', डॉ० सदाशिव देव, वाई तालुका गणित अध्यापक मंडळ, वाई, २०११, पृष्ठे ५६, किंमत ₹ ५०/-

(२) 'मुलाँ रूज' (मूळ लेखक - पीएर ल मूर) स्वैर रूपांतर जयंत गुणे, लोकवाङ्मयगृह, मुंबई, २०११, पृष्ठे ३२४, किंमत ₹ ३००/-

(३) 'लघुनियतकालिकांची वर्णनात्मक सूची', सूरज रफीक, लोकवाङ्मयगृह, मुंबई २०११. पृष्ठे १७२, ₹ २००/-

(४) 'सक्षम समीक्षा' - (आंतरविद्याशाखीय संबंध विशेषांक) जुलै-सप्टें० २०११, संपा० शैलेश त्रिभुवन, पृष्ठे ८८, किंमत ₹ ४०/-

(५) 'सिंधी अध्यात्म शब्दकोश' लछमण हर्दवाणी. सेठ भजनलाल रोहरा चॅरिटेबल ट्रस्ट, मुंबई. (डबल क्राऊन आकार), पृष्ठे २२७, मूल्य अध्यात्म प्रेम.

(६) 'माणकेश्वरचे शिव-सटवाई', नवनाथ शिंदे, पद्मगंधा प्रकाशन, पुणे, पृष्ठे १२८, किंमत ₹ १००/-

(७) 'मर्ढेकरांची काव्यशैली', डॉ० सुरेश भृगुवार, कॉंटिनेंटल प्रकाशन, पुणे, २०११, पृष्ठे २३३, किंमत ₹ २००/-

रुचेची ना, पटेची ना!

----

प्र० ना० परांजपे

( १ ) सामान्यरूपात सुधारणा !

**प्रख्यात साहित्यिक विं०दा० करंदीकर**

विं०दा० करंदीकर यांच्या अनेक कवितासंग्रहातील आवडलेल्या कविता कल्याण टाकसाळे, दीपा देशमुख, सनद गानू, सायली तामणे, गणेश बिराजदार, अभिजित सफई आणि सिद्धार्थ प्रभुणे यांनी कविता वाचून केलं. कल्याण टाकसाळेनं 'पिशीमावशी आणि तिची भूतावळ' या 'हॉरर कविता'च्या संग्रहातली 'किर्रर रात्री, सुन्न रानी' ही कविता साभिनय सादर केली. त्या कवितेतल्या मूळ नाट्यामुळे वेगळंच वातावरण निर्माण झालं होतं.

दै० महाराष्ट्र टाइम्स, पुणे, दि० २४ जुलै २०११

हे कोण 'विं०दा०'? आणि त्यांच्या हॉरर कविता? आणि कवितांचे कवितावाचन!

**डॉ० कदम यांची फोटोबायोग्राफीचे प्रकाशन**

दै० सकाळ, दि० ११ जुलै २०११

मराठीच्या व्याकरणातील 'सुधारणा'!

( २ ) अनेकवचनात सुधारणा !

**असा आहे नेपच्युन**

नेपच्युन हा निळ्या रंगाचा असून, तो सूर्यापासून सर्वांत दूरचा ग्रह आहे. रोमन लोकांच्या समुद्रदेवतेचे नाव या ग्रहाला देण्यात आले. त्याला तेरा उपग्रहे आहेत. या ग्रहाची कक्षा जवळजवळ वर्तुळाकार आहे. त्याच्या वातावरणात प्रामुख्याने हायड्रोजन (८०) टक्के आहे. याशिवाय हेलियम (१९ टक्के) आणि मिथेनही (एक टक्का)

दै० महाराष्ट्र टाइम्स, पुणे, ११ जुलै २०११

### ( ३ ) वाक्यरचनेत सुधारणा !

**लंडन, ता० १९ :** क्रिकेटविश्वात सध्या सचिन तेंडुलकर हाच महान क्रिकेटपटू असल्याचे मत वेस्ट इंडीजचा डावखुरा शैलीदार फलंदाज ब्रायन लारा याने व्यक्त केली. त्याच वेळी इंग्लंडचा माजी कर्णधार ॲलेक स्टुअर्ट याने सचिनला 'आधुनिक क्रिकेटचा डॉन ब्रॅडमन' अशी उपाधी दिली.

दै० सकाळ, २० जुलै २०११

### ( ४ ) प्रमाणलेखनात सुधारणा !

## दुचाकी व दागिण्याचीही चोरी !

प्रवीण हा एका निवृत्त हवाई अधिकाऱ्याचा मुलगा आहे. त्याचे शिक्षण बारावीपर्यंत झाले आहे. दुचाकी चालविण्याच्या छंदातून

दै० सकाळ, ११ जुलै २०११

### ( ५ ) नामाच्या लिंगातील सुधारणा !

## मुख्यमंत्र्यांनी केला 'होमवर्क'

दै० सकाळ, २५ जुलै २०११

# ‘वारी’, ‘रेमण्ड’, ‘भाषा’ इत्यादी

मो०गो० धडफळे

एका मित्राने मला दूरध्वनीवरून ‘वारी’ या शब्दाचा मूळ अर्थ काय? ‘वारीकर’ व ‘वारकरी’ यांतील कोणता शब्द अधिक योग्य आहे? ‘रेमण्ड’ या शब्दाचे मूळ वैदिक भाषेत आहे काय? व ‘भाषा’ म्हणजे काय? अशी विचारणा केली. त्याचे हे उत्तर.

मराठी भाषकांना संस्कृत भाषेची काही प्रमाणात जाण अत्यावश्यक आहे अशी माझी धारणा आहे. ‘दर’ (पुं०) म्हणजे ‘खोलवरची घळ’. याचेच स्त्रीलिंगी रूप ‘दरी’ असे आहे. त्याचप्रमाणे संस्कृतात ‘वार’ म्हणजे ‘जनसमूह’. जनसमूहाची साधारण स्त्री (Society Woman) म्हणजे ‘वाराङ्गना’ (वेश्या) किंवा ‘वास्योषित्’ या वार शब्दाचेच स्त्रीलिंगी रूप ‘वारी’ (जनसमूह, भक्तगण, ईश्वर-निष्ठांची ‘मांदियाळी’, मण्डळी) जनगणाने एकत्र ईश्वरदर्शनासाठी जाणे म्हणजे ‘वारीने (वारीत) जाणे.’ गण याचेही स्त्रीलिंगी रूप ‘गणिका’ (जनगणाची समान स्त्री).

‘वार’ व ‘वारी’ यांच्यांत केवळ लिंगभेदच असल्याने ‘वार-करी’ व ‘वारीकर’ हे दोन्ही शब्द समानयोग्यतेचेच आहेत.

माझा स्नेही नेहेमी ‘रेमण्ड’ वस्त्रनिर्माणाचे कापड खरेदी करतो. त्याला कोणीतरी सांगितले की हा शब्द मूळ वैदिक आहे. ‘कौन बनेगा’च्या अमिताभजींच्या शैलीत सांगायचे तर ‘‘यह उत्तर बिलकुल सही है!’’

वेदोपभाषेत व वेदोत्तर संस्कृतातही ‘रै’ व ‘रयि’ असे शब्द आढळतात. उदा० ‘अग्ने नय सुपथा राय अस्मान्’ (ईशावास्य मंत्र) (हे अग्निदेवते, आम्हास चांगल्या मार्गाने - गैरमार्गाने नव्हे - संपत्तीकडे म्हणजे भरभराटीकडे घेऊन जा.) ‘रायस्पोष’ म्हणजे ‘धनसम्पदेची पुष्टी’. ‘मत्’ हा मत्वर्थीय (possesive) प्रत्यय आहे. बुद्धिमान् (बुद्धिमन्त), हिंदीत ‘अकलमन्द’ (मंद बुद्धीचा नाही) तर ‘अक्कल (आकलन) असणारा’. हिंदीतील उदाहरण अशासाठी दिले की ‘मन्त’चे तिथे ‘मंद’ असे रूप होते. हेच ‘रे (रै-रयि) मंड’ला जवळचे आहे. पार्सी समाजात ‘रेमण्ड’ हे मुलाचे नाव असते. त्याचे मूळ वैदिकातील, ‘रयिमन्ता’ (रैमन्तात) आहे. अर्थ ‘धनवान’. संस्कृतातील ‘र’चा ‘ल’ उच्चार करण्याची प्रवृत्ती अनेक प्राकृत बोलींत आहे. उदा० मागधीत ‘अरे’चे ‘अले’ होते.



अनुक्रमणिका

'ज्वर' म्हणजे ताप (अंगाची लाही होणे). ज्वर व ज्वल् (जाळ) एकच आहेत.

हेच नेमके रयि व रैचे धनगरी मराठी बोलीत झालेले आहे. थोडक्यात लयी (लई). आता कदाचित तुम्ही म्हणाल, ''लई म्हंजे लयीच झालं!'' त्याला मी बापडा काय करणार?

सध्या आपण 'भाषा' हा शब्द सामान्य अर्थाने (लँग्वेज) या आंग्ल शब्दाचा भारतीय अवतार मानतो. हे काही गैर नाही. पण पाणिनींनी आपल्या अष्टाध्यायीत वैदिक बोलींसाठी 'छन्दस्' (तुळा Cadence) तर ज्याला आपण सर्वसामान्य अर्थाने अभिजात संस्कृत (Classical Sanskrit) म्हणतो, त्यासाठी 'भाषा' हे विशेषनाम (Proper Noun) म्हणून वापरले आहे. 'छन्दसि' व 'भाषायाम्' असे विशेषक शब्द सूत्रांमध्ये आढळतात.

मी सध्या एक पुस्तिका लिहीत आहे. त्याचे नामाभिधान 'भाषे'कडून 'भाषे'कडे' असे आहे. एकेकाळच्या पाणिनीय संस्कृत परंपरेत 'भाषा' म्हणजे अभिजात संस्कृत तर आजच्या घनश्यामादींच्या टीकेत 'भाषा' म्हणजे 'प्राकृत' मध्य युरोभारतीय व आधुनिक प्रांतिक भाषाही (नव्या युरोभारतीय). उदा० 'उत्तररामचरिता'वरील आपल्या टीकेत घनश्याम म्हणतो, 'ललितलवली' ति भाषायां 'हरफारेवडी' इति; महाराष्ट्र्यां 'राय-आवळी'. हरफारेवडी हा हिंदी पर्याय, तर 'रायआवळी' हा शुद्ध मऱ्हाटी मायबोलीतील रूढ शब्द. म्हणजे 'भाषा' (अभिजात संस्कृत) या शब्दाच्या अर्थाने वळण घेत घेत पुरते १८० अंश वर्तुळाकार फिरून नेमके संस्कृत भाषेपासून प्राकृत व प्रादेशिक भाषेपर्यंतचे अर्थान्तर साधले आहे. ह्याला मी म्हणतो, 'भाषे'कडून 'भाषे'कडे! ■

## गतिमानतेची गूढ अद्‌भुतता

टॉलस्टॉय यांनी म्हटलं आहे- 'हे किरकिरणारं यंत्र-सिनेमा-लेखकांच्या आयुष्यात क्रांती घडवून आणणार आहे. साहित्यकलेच्या जुन्यापुराण्या तंत्रावरचा हा थेट आघात आहे. आम्हाला सावल्यांचा खेळ दाखवणाऱ्या पडद्याशी आणि संवेदनाशून्य यंत्राशी जुळवून घ्यावं लागेल. एका नवीन प्रकारच्या लिखाणाची आता आवश्यकता भासेल. मी त्याबाबत विचार केलेला आहे आणि येणाऱ्या गोष्टींची मला चाहूल लागली आहे. मला हे आवडलंच आहे. आम्हाला जड, पल्लेदार लिखाणाची सवय झालेली आहे, त्याच्यापेक्षा झटकन बदलणारे हे देखावे, ही प्रचीती आणि भावनांचा मिलाप नक्कीच अधिक चांगला आहे. तो आयुष्याला अधिक जवळचा आहे. सिनेमाला गतिमानतेच्या गूढ अद्‌भुततेचं ईश्वरी वरदान लाभलेलं आहे आणि ही निव्वळ महानता आहे!'

- दिनकर गांगल

# गणिताची मराठी परिभाषा प्रचारात

-

विज्ञानातील गणित विषयात क्रमिक पुस्तकांशिवाय अन्य साहित्य सहसा प्रसिद्ध होत नाही. त्यामुळे गणितात रस असणाऱ्या विद्यार्थ्यांना मराठी भाषेत असे व्यापक साहित्य अभ्यासासाठी उपलब्ध नसते. ही गरज ओळखून मराठी भाषेतून असे साहित्य उपलब्ध करण्याच्या प्रकल्पास श्री० नागेश शंकर मोने यांनी सुरूवात केली. श्री० मोने यांनी आतापर्यंत ३५ पुस्तिका प्रसिद्ध केल्या आहेत. यांपैकी बहुतेक पुस्तिका ५० पृष्ठांच्या आसपास आहेत. या पुस्तिका एकत्र आणल्या तर अंदाजे १५०० पृष्ठांचा 'विभाजित कोश' स्वरूप ग्रंथ तयार होईल. गणितातील या पुस्तिकांच्या प्रकाशनातून मराठी भाषेचा फायदा झाला. गणिताची परिभाषा काही वर्षांपूर्वी महाराष्ट्र सरकार, भाषा संचालनालय यांनी प्रयत्नपूर्वक तयार केली आहे. यापैकी बहुसंख्य शब्द उपयोजित झालेले नाहीत. या प्रकल्पामुळे यांपैकी काही शब्द वापरले गेले. उदाहरणार्थ, दीर्घ वर्तुळ (Ellipse), अन्वस्त (Parabola), अपास्त (Hyperbola), नाभी (Focus).) या पुस्तिका वाई तालुका गणित अध्यापक मंडळ, वाई या संस्थेने प्रकाशित केल्या आहेत. ■



# भाषांतरविद्येचा पदविका अभ्यासक्रम

ऐक्यभारती ह्या संस्थेतर्फे भाषांतरविद्येचा पदविका अभ्यासक्रम सुरू झाला आहे. त्यात मराठी अभ्यास परिषदेचे सहकार्यवाह श्री० विजय पाध्ये ह्यांचे, युनिकोडचा वापर करून मराठी देवनागरीतून टंकन कसे निःशंक व सुलभपणे करता येते हे समजावून देणारे एक मार्गदर्शनपर सत्र रविवार दि० ४ डिसेंबर २०११ रोजी पुणे येथे आयोजित करण्यात आले होते.

भाषांतर-व्यवसायाच्या क्षेत्रातील संधींची व्यापकता लक्षात घेता, व्यावसायिक





अनुक्रमणिका

भाषांतरकर्मी म्हणून उद्योगक्षेत्र निवडू पाहणाऱ्या व्यक्तीस संगणक, महाजाल व युनिकोड ह्यांचा वापर करण्यासाठी लागणारे ज्ञान संपादन करणे अत्यावश्यक ठरते; असे त्यांनी सांगितले. ह्या सत्रास भाषांतरविद्येच्या अभ्यासक्रमात सहभागी झालेल्या विद्यार्थ्यांखेरीज विशेष करून युनिकोडविषयी कुतूहल व जिज्ञासा असणाऱ्या व्यक्तीही उपस्थिती राहिल्या होत्या. ■

## चुकांची दुरुस्ती

**वर्ष २३ अंक ३ 'छंदोलय आणि मुक्तछंद' या लेखातील दुरुस्त्या**

| पृष्ठ | ओळ | | चूक | बरोबर |
|---|---|---|---|---|
| ५ | खालून | ९ | नाही. | नाही |
| ९ | वरून | ८ | छंदशास्त्राचा | छंद:शास्त्राचा |
| ९ | खालून | १३ | गद्यप्रयता | गद्यप्रायता |
| ९ | खालून | १० | प्राणीमात्रांपासून | प्राणिमात्रांपासून |
| १० | वरून | १५ | जिव्हेष्ठविराम | जिव्हेष्टविराम |
| १० | वरून | १६ व २० | गृहित | गृहीत |
| ११ | खालून | ११ | कवाऽपि! | क्वाऽपि |
| ११ | खालून | १० | बहुदा | बहुधा |
| ११ | खालून | ८ | वाक्यम् | काव्यम् |
| ११ | खालून | ५ | सालंकारसानेकवृत्तिवीक् - | 'सालंकारसानेकवृत्तिर्वाक्' |
| १२ | वरून | १७ | शब्दार्थो | शब्दार्थौ |
| १२ | वरून | १८ | विशेषत् | विशेषवत् |
| १२ | वरून | १८ | कंडाला | कुण्डला |
| १३ | खालून | २ | सत् | सद् |
| १४ | वरून | १ | द्रष्ट्चव्य | द्रष्टव्य: |
| १४ | वरून | ६ | बुद्धं; संघं | बुद्धम्, संघम् |
| १५ | खालून | १० | जटील | जटिल |
| १५ | खालून | ९ | ऐवजी. | ऐवजी |
| २० | खालून | ८ | - | छंदोबद्धता |
| २० | वरून | १२ | कालविपर्यासी | कालविपर्यस्त |
| २१ | वरून | ३ | लघुगुरूयुक्त | लघुगुरुयुक्त |





अनुक्रमणिका

# मुखपृष्ठाविषयी

लीला अर्जुनवाडकर

भाषा आणि जीवनच्या दोन अंकांवर (वर्ष २९, अंक २ व ३) चंद्रमोहन कुलकर्णी यांची दोन चित्रे (की रेखाटने?) प्रकाशित झाली आहेत. या चित्रांचा काय अर्थ वाचकाला/ प्रेक्षकाला कळतो, हा या बाबतीतला सतावणारा प्रश्न आहे. सामान्य वाचकाला/ प्रेक्षकाचा अनुभव असा की या 'चित्रलेखेचे गूढगुंजन' अजिबात उकलत नाही. चित्रलेखा आपल्याशी बोलतच नाही. सामान्य माणसाची अपेक्षा अशी असते की चित्राला काही अर्थ असतो अशी चित्राने आपला अर्थ कळेल अशी काही पाऊलवाट, चोरवाट तरी दाखवली पाहिजे. म्हणजे चित्राने आपल्या अनुभवविश्वाशी कुठे तरी लागेबांधे जुळवले पाहिजेत. तरच आपण त्यात प्रवेश करू शकू.

या दोन्ही चित्रांतील आकार लाकडाचे वाटतात. पण त्यांत पाने व चोचीत कोवळीशी डहाळी घेतलेला पक्षी आहे. काही निर्जीवशा भासणाऱ्या, तासूनशा काढलेल्या (कारण बाजूला लाकडाच्या दोन कपच्याहीं दिसतात.) लाकडांमधला जिवंतपणा सूचित करणाऱ्या या खुणा आहेत का? पर्यायाने या चित्रांमधून पर्यावरणविषयक काही सांगायचा विचार आहे का? (असे मत एका दर्दी जाणकार कलावंताने सूचित केले.)

खुद्द चंद्रमोहन कुलकर्णी म्हणतात की, त्या रेखाटनात म्हणा चित्रांत म्हणा मी इतका गुंग झालो होतो की ती पूर्ण झाल्यावरच मी भानावर आलो. एका 'No man's land'मधेच मी होतो. मी त्याबद्दल काय सांगू?

मला असे म्हणायचे नाही की, पुस्तकाच्या (लोकप्रिय) नियतकालिकाच्या मुखपृष्ठांवर फक्त बाईचे किंवा गोंडस बाळाचेच चित्र असायला हवे. 'abstract art' हाही एक चित्रकला परंपरेमधील प्रकार आहे. 'भाषा आणि जीवन'ची ही दोन मुखपृष्ठे त्या परंपरेतली मानायची का? ■

## स्वागत

'डॉ० अशोक केळकर : व्यक्ती आणि विचार' - डीव्हीडी, अतुल पेठे प्रॉडक्शन्स, पुणे. अनुष्टुभ वितरण, मूल्य ₹ १००/-





अनुक्रमणिका

प्रतिसाद - २

# मुखपृष्ठाविषयी

नीलिमा गुंडी

'भाषा आणि जीवन'च्या वर्ष २९च्या सर्व अंकांवरील मुखपृष्ठे चंद्रमोहन कुलकर्णी यांच्या सिद्धहस्त कुंचल्यातून साकार झाली आहेत. अंक १च्या मुखपृष्ठावरील चित्रात कासवाने आधार दिलेली व कासवापुढे नतमस्तक होणारी मानवी आकृती रेखाटली आहे. आल्हाददायक हिरव्या रंगाच्या पार्श्वभूमीवरील या चित्रात कासवाच्या पाठीवरचे त्रिदळ हे प्रतीकात्मक वाटते. हजारो वर्षे मानवी संस्कृतीचा भार वाहणारी भाषा दीर्घायुषी कासवाच्या रूपाने यात साकार झाली आहे, असे वाटते. त्यावर वाहिलेले त्रिदळ म्हणजे भाषेच्या सांस्कृतिक ऋणाविषयीच्या श्रद्धेचे प्रतीक वाटते.

अंक २वरील चित्र खोडापासून सुटणारी काही पाने आणि खोडाला फुटलेले एक पान, अशा स्वरूपाचे आहे. खोडामध्येही पानाचे ठसे कोरलेले आहेत. समाजवृक्षाला चैतन्यरस पुरवणारी भाषा पानांच्या रूपातून जणू साकार झाली आहे.

अंक ३वरील चित्राचा आकार काहीसा गूढ आहे. त्यातील खोडाच्या विविध आकारांचे कलात्मक प्रयोजन मला नेमकेपणे सांगणे कठीण वाटते. मात्र खोडाच्या आधाराने उभे राहिलेले नाजूक चित्र नक्कीच लक्ष वेधून घेते. त्या चित्रात खांबाच्या टोकालाच पक्ष्याचा आकार मिळाला असून पक्ष्याने चोचीत कोवळी पालवी धरून आणली आहे. एकंदरीत कपचे उडालेल्या, राठ वृक्षालाही सर्जनशीलतेचे धुमारे जपावेसे वाटत आहेत.

दिवाळी अंकावरील मुखपृष्ठ पाहताक्षणीच नजरेत भरते. त्या चित्रामधील गुलाबी, लाल, पिवळा, मातकट या रंगांची परस्परांशी सहज संगती साधली आहे. रंग आणि आकार यांची संगती एकत्रितरीत्याही उठावदार झाली आहे. ओबडधोबड अशा दगडांवर रेखाटलेले पानाफुलांचे आकार त्या दगडांना केवळ सौंदर्य बहाल करून थांबत नाहीत, तर निर्जीव दगडांनी जणू 'फॉसिल्स'सारखे हे सौंदर्याचे ठसे आपल्यापाशी कायम जतन करून ठेवले आहेत, असे वाटते. चित्राच्या वरील कोपऱ्यात रंगवलेले अर्धे सुकलेले पान पाहताना तर हे विशेषच जाणवते. एकंदरीत ही सर्व चित्रे भाषा आणि संस्कृतीच्या सर्जनशीलतेविषयीचे संवेदन व्यक्त करीत आहेत, असे मला वाटते.

■



अनुक्रमणिका

# मुखपृष्ठाविषयी

शैलेश सादरे

'भाषा आणि जीवन'च्या वर्ष २९च्या अंक ३ मधील आवाहन.

आपल्या शिक्षणपद्धतीत एक मोठी उणीव आहे ती म्हणजे आपल्याला मुळात कवितेचे, धड्यांचे, भाषेचे रसग्रहण (ॲप्रिशिएन) एक तर चुकीच्या पद्धतीने शिकवले जाते आणि आपल्या शिक्षणपद्धतीमध्ये मुळातच चित्रांचे रसग्रहण हा प्रकार अस्तित्वात नाही.

एकूण मराठी समाजाची भाषेविषयी जेवढी अनास्था दिसून येते त्याहून जास्त चित्र आणि चित्रकार, शिल्पकार ह्यांच्याबद्दल आहे. अगदी अभिजात वाचकवर्गसुद्धा चित्रावर काही भाष्य करायची हिंमत करत नाही. ह्याचं एक कारण चित्र, त्याच्या विविध शैली आणि रंगसंगतीचे होणारे मानसिक परिणाम ह्यांबद्दल सगळेच अनभिज्ञ आहेत.

मला चित्रे पाहण्याची आवड आहे, पण मुळात चित्र समजून घेणे किंवा चित्र समजून देणे आपल्याकडे घडत नाही. फक्त बघा आणि 'वाह वाह' करा! किंवा नावं ठेवा. त्याचीसुद्धा कोणत्याही मासिकात नोंद घेतली जात नाही. जी आहे ती तुरळक. वसंत डहाके ज्या चित्राबद्दल लिहितील तेवढे वाचून शांत बसणे हा एकच पर्याय शिल्लक राहतो.

'भाषा आणि जीवन'च्या मुखपृष्ठावरील चित्रे मला आवडतात. पण नुसते आवडतात म्हणणे पुरेसे नाही. माझी स्वत:ची, चित्राबद्दल अभ्यासून, त्यातील गुण-अवगुण शोधण्याची समज अजून तयार झालेली नाही. ह्याचं एक कारण आपल्या सगळ्याच समाजाची ह्याविषयीची उदासीनता अन् दुसरे म्हणजे हवे तेवढ्या सातत्याने चित्रांवर समीक्षा अन् लेख येत नाहीत.

चित्रांवर 'भाषा आणि जीवन'मध्ये नियमित लेख यावेत अशी अपेक्षा आहे. कारण चित्रकाराशी संवाद साधायचा असेल तर मुळात चित्राची भाषा आम्हांला शिकणे गरजेचे आहे. नाहीतर आम्ही जे बोलू त्याने गोंगाट होईल - संवाद नाही. ■

**'भाषा आणि जीवन'च्या वाचकवर्गाला**
**नव्या वर्षानिमित्त शुभेच्छा !**





अनुक्रमणिका

# अठरा विश्वे

हेमा क्षीरसागर

[ संदर्भ : 'भाषा आणि जीवन' पावसाळा २०१०, शकुंतला फडणीस (पृ० ७४), शं०दे० पसारकर (पृ० ७३).]

कर्नाटक-महाराष्ट्र सीमेवरील बेळगाव या गावातली एक मिळती-जुळती आठवण. सुमारे ६० वर्षांपूर्वीचा काळ. स्वयंपाकासाठी चूल, वैलचूल, शेगडी अशी साधने वापरात होती. ती पेटवण्यासाठी किंवा पेटती ठेवण्यासाठी 'शेणी' वापरत असत. शेणी (शेणकूट) म्हणजे शेण, कोळशाची खर आणि भाताचा भुसा कालवून थापलेली व उन्हात वाळवलेली शेणाची भाकरी (आकारसादृश्य). अशा शेणी बनवून, बुट्टीतून (= हाऱ्यातून) दारोदार विकणे हा गरीब स्त्रियांचा एक व्यवसाय होता. हा व्यवसाय शेकड्यावर व्हायचा. पण शेकडा मोजता येत नव्हता. त्या वेळी एका हातात तीन व दुसऱ्या हातात दोन अशा ५ शेणी मोजून त्या एक (१) म्हणायच्या आणि असे २० घातले की 'पाच विसा' किंवा 'पाच इसा' म्हणजे शंभर व्हायचे. पण त्या वेळी ५ विसा एक (=१०५) किंवा ५ विसा दोन (=११०)चा शेकडा असायचा. ■

## श्रद्धांजली

हैदराबाद येथील ज्येष्ठ संशोधक आणि 'पंचधारा'चे संपादक **प्रा० द०पं० जोशी** यांचे ३० डिसेंबर २०११ला दु:खद निधन झाले. मराठी साहित्य परिषद, आंध्र प्रदेश या संस्थेचे ते अध्यक्ष होते. वाङ्मयीन उपक्रमांमागील त्यांची निष्ठा वाखाणण्याजोगी होती. त्यांनी संशोधनाबरोबरच स्वतंत्र आणि अनुवादित असे लेखनही केले आहे. आम्ही परिषदेतर्फे त्यांना श्रद्धांजली अर्पण करतो.

## आवाहन

'भाषा आणि जीवन' या त्रैमासिकांचा एक अंक या वर्षी 'बोली विशेषांक' या स्वरूपात काढावयाचा आहे. त्यासाठी अभ्यासकांकडून लेखनसहकार्य अपेक्षित आहे :

लेखनप्रकार :

(१) महाराष्ट्रातील विविध बोलींमधील शब्द/वाक्प्रचार/म्हणी यांविषयीच्या कोश-कार्याची माहिती.

(२) बोलींच्या जतन-संवर्धनविषयक उपक्रमांची माहिती.

(३) बोलींविषयी भाषावैज्ञानिक, तसेच सांस्कृतिक अंगाने केलेले संशोधनपर लेखन.

(४) बोलींमधील वैशिष्ट्यपूर्ण साहित्यकृतींचा परिचय करून देणारे लेखन.

(५) प्रमाणभाषा आणि बोली यांच्यातील संबंधावर अभ्यासपूर्ण भाष्य करणारे लेखन.

टीप : कृपया संपादकीय पत्रव्यवहारासाठीचा बदललेला पत्ता लक्षात घ्यावा.

## मार्सेल दूशाचे एक चित्र

'संकल्पनात्मक परिमाण' हा विचार दूशाच्या काही चित्रांतून व्यक्त झालेला आढळतो. चित्राची संरचना व विचाराचा विशिष्ट आविष्कार त्यानं जाणीवपूर्वक एका विशिष्ट संकल्पनेतून केला आहे. उदाहरणार्थ, दूशाला आपल्या भावाचं बुद्धिबळ खेळणं चित्रगोचर करायचं होतं. खरं तर 'बुद्धिबळ खेळणं' हा विषय त्यानं पूर्वी हाताळला होता. 'द चेस गेम' हे त्याचं चित्र उदाहरण म्हणून देता येईल. यातील चित्रीकरण सांकेतिक पद्धतीनं व जवळपास ॲकॅडेमिक शैलीनं केलं आहे. मात्र १९११ साली काढलेल्या 'द चेस प्लेअर्स' या चित्रात त्यानं घनवादी (cubist) शैलीचा उपयोग केला आहे. 'द चेस गेम'मध्ये आपल्या भावंडांचं (दोन भाऊ व दोन बहिणी) बुद्धिबळ खेळतानाचं चित्रण परंपरागत पद्धतीनं त्यानं केलं होतं. त्या चित्रातून भावंडांचे चेहरे व त्यावर उमटलेले भाव स्पष्टपणे दिसतात. त्यांचा पेहराव, त्यांचं विशिष्ट पद्धतीनं बसणं इ० हे देखील सहज व स्वाभाविकपणे दृग्गोचर झालं आहे; पण १९११ साली काढलेल्या चित्रात भावंडांचे चेहरे, मस्तकं आणि बुद्धिबळातील सोंगट्या परस्परात मिसळून गेल्या आहेत. बुद्धिबळाचं भौतिक रूप आणि खेळाडूंनी केलेल्या व्यूहात्मक खेळी, यांचं एकत्रित रूप पाहणाऱ्याच्या नजरेत भरतं. या चित्राचा एक विशेष म्हणजे कॅनव्हासच्या चारही बाजू रंगवून, बुद्धिबळपटाचा आभास निर्माण करण्याचा दूशानं प्रयत्न केला आहे.

रमेशचंद्र पाटकर 'खेळ', जानेवारी-मार्च २०११, पृ० ११





अनुक्रमणिका

## लेखक-परिचय

- **कुलकर्णी, कल्पना :** एम०ए० इंग्लिश, एम०फिल०,पीएच०डी०(स्टायलिस्टिक्स) महाविद्यालय व विद्यापीठ स्तरावर अध्यापन, सध्या निवृत्त, पुणे विद्यापीठाचा इंग्लिश विभाग व ब्रिटिश कौन्सिल यांच्या एका संयुक्त प्रकल्पात सहभाग.
  टपाल-पत्ता : ए-11, सूर्यप्रकाश अपार्टमेंट्स, मार्केट यार्ड रस्ता, पुणे 411 037.
  चलभाष 98904 66067
- **खोपकर, अरुण :** विज्ञान शाखेतील पदवी. फिल्म अँड टेलिव्हिजन इन्स्टिट्यूट-मध्ये पदव्युत्तर शिक्षण. सुमारे ४० लघुचित्रपटांची निर्मिती, १५ राष्ट्रीय आणि आंतर-राष्ट्रीय पुरस्कार. त्यात सर्वश्रेष्ठ नॉन-फीचर चित्रपट आणि त्याचे दिग्दर्शन याबद्दल तीनदा सुवर्णपदक. श्री० मणी कौल यांच्या 'आषाढ का एक दिन' या चित्रपटात कालिदासाची मुख्य भूमिका. 'कथा दोन गणपतरावांची' हा चित्रपट दिग्दर्शित. 'गुरुदत्त : तीन अंकी शोकांतिका' या पुस्तकाला राष्ट्रीय पुरस्कार. अनेक राष्ट्रीय आणि आंतरराष्ट्रीय स्तरावरील संस्थांमध्ये अध्यापन व नियतकालिकांतून लेखन.
  टपाल-पत्ता : 212-ए, कल्पतरु हॅबिटट, सी०एच०एस०, एस०एस० राव रस्ता, परळ, मुंबई 400 012. ई-पत्ता : arunkhopkar@gmail.com
- **चांगण, कोकिळा :** एम०ए० मराठी. कडेगाव येथील कन्या महाविद्यालयातील राष्ट्रीय चर्चासत्रात शोधनिबंध सादर. स्थिरभाष (02166) 221728
  टपाल-पत्ता : मु०पो० दुधेबावी, ता० फलटण. जि० सातारा 415 523.
  चलभाष 94238 63726 ई-पत्ता : jgd_kokila2@yahoo.in
- **जोगळेकर, हेमंत :** मुंबई आय०आय०टी०मधून रासायनिक अभियांत्रिकीमध्ये पदवी, राष्ट्रीय रासायनिक प्रयोगशाळा, पुणे येथून वरिष्ठ शास्त्रज्ञ म्हणून निवृत्त. 'होड्या', 'माझा(पण) बेहद्द नाममात्र घोडा' (विडंबन कविता), 'मनातले घर', 'उघडे पुस्तक' हे कवितासंग्रह प्रकाशित. केशवसुत व बालकवी पुरस्कार प्राप्त. काही कवितांची विविध भाषांमध्ये भाषांतरे. अनेक प्रातिनिधिक संग्रहांमध्ये कवितांना स्थान.
  टपाल-पत्ता : हेमलता, 917/19 फर्ग्युसन महाविद्यालय रस्ता, पुणे 411 004.
  चलभाष 0942355 82565 ई-पत्ता : hemantjoglekar@yahoo.com
- **धडफळे, मो०गो० :** फर्ग्युसन महाविद्यालय, पुणे येथे 38 वर्षे संस्कृत व पाली भाषांचे अध्यापन. टिळक महाराष्ट्र विद्यापीठात युरो-भारतीय भाषाविज्ञानाचे अध्यापन. अनेक इंग्रजी ग्रंथांचे व 'साहित्य सावित्री', 'पालि-बौद्ध संतसाहित्य', 'धर्मानंद कोसंबी : पालि-बौद्ध धर्माचे भाष्यकार' ह्यांसह मराठी पुस्तकांचे लेखक. सुमारे 150 शोधनिबंध प्रसिद्ध. इराण शासनातर्फे इराण भाषातज्ज्ञ म्हणून, तसेच जम्मू-कश्मीर विद्यापीठातर्फे मंजुश्री पुरस्कार देऊन गौरव.
  टपाल-पत्ता : 2 'यशोदीप-ब', रामबाग वसाहत, सदाशिव पेठ, पुणे 411 030.
  स्थिरभाष (020) 2433 2081

- **पवार, माधवी :** एम०ए०,बी०एड०, नेट-जेआरएफ. (मराठी).
टपाल-पत्ता : मु०पो० निंबळक (कापसेवस्ती), ता० फलटण, जि० सातारा 415523.
- **पाध्ये, विजय :** पुण्यातील तीन उद्योगसमूहांमध्ये विविध उच्च पदांवर ३२ वर्षे नोकरी. १९९८ पासून उद्योगसमूहांच्या गृहपत्रिकांचे संपादन, विविध क्षेत्रांतील दस्तऐवजांचे इंग्रजीमधून मराठीत भाषांतर करण्याचा व्यवसाय.
टपाल-पत्ता : 4 चित्रा, 'बी', विद्यासागर सोसायटी, बिबवेवाडी, पुणे 411 037.
स्थिरभाष : (020) 2441 1951 चलभाष : 098220 31963
ई-पत्ता : v.wordsmith@gmail.com
- **पाटकर, रमेशचंद्र :** विल्सन महाविद्यालय, मुंबई येथून मराठी विभाग प्रमुख म्हणून निवृत्त. 'कलेचा इतिहास : भारतीय पाश्चात्त्य' हे पुस्तक प्रकाशित. कथा, कविता, संपादने, साहित्यसमीक्षा इ० लेखन.
टपाल-पत्ता : 21, शांतिनिकेतन, काशीनाथ धुरू रस्ता, कीर्ती कॉलेजसमोर, दादर, मुंबई 400 028.
- **डॉ० पानसे, रमेश :** अर्थशास्त्राचे निवृत्त प्राध्यापक. शिक्षणतज्ज्ञ. ठाणे जिल्ह्यातील आदिवासी विकास व शिक्षणविषयक प्रयोग. अर्थशास्त्र, समाजशास्त्र व शिक्षण या विषयांत ग्रंथलेखन, २५हून अधिक स्वतंत्र व संपादित पुस्तके. 'ग्राममंगल' संस्थेचे संस्थापक, 'बालशिक्षण, संशोधन व विकासकेंद्र' या संस्थेचे संचालक, सामाजिक कार्यासाठी अनेक पुरस्कार व सन्मान प्राप्त. 'शिक्षण - आनंदक्षण', 'शिक्षण : सामाजिक परिवर्तनाची चळवळ' आदी ग्रंथ महत्त्वपूर्ण.
टपाल-पत्ता : 1452, रविवार पेठ, वाई, जि० सातारा 412 803.
- **पांडे, भारती :** एम०ए० (मराठी, लिंग्विस्टिक्स), वृत्तविद्या पदवी. जपानी भाषेची पदविका. व्यावसायिक अनुवादकार. कथा, कविता, ललित गद्य, वैचारिक गद्य इत्यादी प्रकारचे स्वतंत्र लेखन. अनेक ललित कलाकृतींचा इंग्लिशमधून मराठीत अनुवाद.
टपाल-पत्ता : 15-ए/8, संजीवन हॉस्पिटलशेजारी, एरंडवणा, पुणे 411 004.
चलभाष : 098906 66915 ई-पत्ता : bharati_pande@yahoo.com

**आवाहन**

आपण 'भाषा आणि जीवन'चे वाचक आहात. आपण परिषदेसाठी पुढीलप्रकारे सहकार्य करू शकता :

(१) स्वत: नियमित वार्षिक वर्गणी भरणे. वर्गणीदार मिळवून देणे.
(२) परिषदेचे आजीव सदस्यत्व स्वीकारणे.
(३) लेखनसहकार्य करणे.
(४) आपले महाविद्यालय आणि मित्रपरिवार यांना परिषदेशी जोडणे.
(५) परिषदेला देणगी देणे.

**मुखपृष्ठाविषयी :** कविवर्य कुसुमाग्रजांना जन्मशताब्दिवर्षानिमित्त अभिवादन
मुखपृष्ठावरील पंक्ती-संदर्भ : 'कागद', 'प्रवासी पक्षी', 'कुसुमाग्रज' (संपादक शंकर वैद्य), पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, १९८९, पृ० ९७-९८

